


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन








अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| असमिया | नतुन बसरर बाबे शुभेच्छा जनालो |
| उर्दू | नया साल मुबारक |
| उडिया | नब बर्षर शुभकामना |
| कन्नड | होस वर्षद शुभेच्छेगळु |
| काश्मिरी | नोव वहरय मुबारक |
| गुजराथी | नववर्षनी हार्दिक शुभेच्छा |
| तमीळ | पुत्ताण्डु नल्वाळ्त्तुक्कळ् |
| तेलुगू | कोत्त संवत्सरम शुभाकांक्षलु |
| पंजाबी | नवां साल मुबारक |
| बंगाली | नबबर्षेर प्रीति ओ शुभेच्छा जानाई |
| मराठी | नववर्षानिमित्त हार्दिक शुभेच्छा |
| मल्याळी | नववत्सराशंसकळ् |
| संस्कृत | नववर्षस्य शुभकामनाः |
| सिंधी | नए साल लाए शुभ इच्छाऊं |
| हिंदी | नए वर्ष की शुभ कामनाएं |
| इंग्लिश | बेस्ट विशेस फॉर द न्यू ईयर |

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १६ : अंक ४ दिवाळी १९९८



अनुक्रमणिका

# अनुक्रम



---

- प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
- संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी
- संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव, सुप्रिया, ६१/१४ एरंडवन, पुणे ४११००४. दूरध्वनी : ३६८६९३
- व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४एरंडवन, पुणे ४११००४. दूरध्वनी : ३३३८६९
- पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरण पृष्ठ तीन पहा.
- सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/ लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
- या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.
- संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
- मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९

# मुलाखत: एक देणेघेणे

**अशोक रा. केळकर**

मुलाखत ह्या अरबी शब्दाचा मूळचा अर्थ भेट एवढाच केवळ आहे. ('पहली मुलाक़ात' म्हणजे पहिली भेट.) पण आज मात्र मुलाखत हा पाश्चात्यांकडून आयात केलेला भाषाव्यवहाराचा एक बहु-उद्देशीय प्रकार ठरला आहे. (उर्दूत interview हा इंग्रजी शब्दच आयात केला आहे तर हिंदीने 'साक्षात्कार' हा प्रतिशब्द, बहुधा बांगला भाषेचे अनुकरण करून, उपस्थित केला आहे.)

मुलाखत हा कशा स्वरूपाचा भाषाव्यवहार? भाषाव्यवहाराचा सर्वांत स्वाभाविक प्रकार म्हणजे अन्योन्यसंवाद -दोघांनी एकमेकांशी बोलणे आणि एकमेकांचे ऐकून घेणे. पण माणूस दुसऱ्याचे ऐकत असताना आणि एरवी देखील नुसता 'गप्प' बसलेला असतो असे नाही. तो मनातल्या मनात स्वत:शी बोलत असतो म्हणजे स्वसंवाद करीत असतो. या दोन प्रकारांपेक्षा काहीसा कृत्रिम असा तिसरा एक प्रकार म्हणजे अन्यसंवाद. काल आम्ही काय गंमत केली हे सांगणारे किंवा गोष्ट सांगणारे मूल अन्यसंवाद करायला शिकत असते- एकट्याने बोलायचे पण इतरांनी नुसते ऐकायचे. वरवर पाहता मुलाखत हा अन्योन्यसंवादाचा प्रकार, पण तो अन्यसंवादाच्या जवळ जाणारा. मुलाखत घेणारा पुढाकार घेऊन दुसऱ्याला एकामागून एक प्रश्न विचारतो आणि दुसरा म्हणजे मुलाखत देणारा त्याला तसतशी कमीअधिक विस्ताराने उत्तरे देत राहतो. मुलाखत घेणारा मुख्यतः संदेशग्राहकाची भूमिका घेत असतो तर ती देणारा मुख्यतः संदेशप्रेषकाची भूमिका घेत असतो. हा भूमिकांचा तोल राहिला नाही, म्हणजे मुलाखत कोण कुणाची घेतो आहे हा संभ्रम उत्पन्न होतो आणि मुलाखत बिघडते, बिघडते म्हणजे तिचे उद्दिष्ट बाजूला पडते, मग ते उद्दिष्ट कोणतेही असू दे. मुलाखत हा बहु-उद्देशीय भाषाव्यवहार असल्यामुळे उद्दिष्टानुसार तिचे स्वरूप वेगवेगळे राहील. साधारणपणे मुलाखतींचे तीन प्रकार पडतात. या तीनही प्रकारांत एक गोष्ट समान आहे: प्रश्नकर्त्याच्या जिज्ञासेची पूर्ती त्याला मिळणाऱ्या उत्तरातून व्हायची असते. तशी ती पूर्ती झाली म्हणजे मुलाखत सफल झाली म्हणायचे.

समाजाच्या दृष्टीने कुणीएक महत्त्वाची व्यक्ती विशिष्ट क्षेत्रात नेतृत्व करणारी किंवा तज्ज्ञतेचा अधिकार सांगणारी असते. त्या व्यक्तीला अमुक एका विषयाबद्दल मते असणार, अमुक वस्तुस्थितीबद्दल वा घटनाक्रमाबद्दल माहिती असणार. ही मते किंवा ही माहिती याबद्दल समाजातील इतरांना जिज्ञासा असली तर ती पुरी होण्याचे

दोन मार्ग आहेत. एक तर ती व्यक्ती आपण होऊन सर्वांना उद्देशून भाषण करील किंवा जिज्ञासूंचा प्रतिनिधी म्हणून कुणी पत्रकार वा शोधकर्ता त्या व्यक्तीची मुलाखत घेईल. उदाहरणार्थ अर्थमंत्र्याने देशवासियांना उद्देशून भाषण न करता एखाद्या अर्थतज्ज्ञाने अर्थमंत्र्याची काही आर्थिक धोरणाविषयी मुलाखत घ्यायची. क्वचित् मुलाखतदाते किंवा मुलाखतकार एकाहून अधिक असतात. सामान्य संकेत म्हणजे ही मुलाखत कमीअधिक औपचारिक असेल. (मुलाखतदाता चित्रपटतारका असली किंवा मुलाखतकार वार्तालापाचे तंत्र वापरत असला तरी हे लागू पडते.) ती कमीअधिक आखीव असेल: आधाराला कधी सरळसरळ प्रश्नावली असेल, कधी निवळ विषयक्रम असेल, कधी एखादे विषयकेंद्र असेल एवढेच. आणखी म्हणजे ती कमीअधिक तपशिलात, किंवा खोलात जाणारी असेल. वेळ किती उपलब्ध आहे, जिज्ञासा कितपत तीव्र आहे, मुलाखतदार ती पुरी करायला किती उत्सुक आहे अशा गोष्टींवर ते अवलंबून आहे. मुलाखतीत याप्रमाणे कमीअधिकपणाला वाव असला तरी या प्रकारच्या मुलाखतीत एक संकेत मात्र पक्का असतो: मुलाखतकार गरजू आहे, मुलाखतदाता त्याच्यावर अनुग्रह (favour) करीत आहे. त्यामुळे पुष्कळदा मुलाखतकाराच्या आभार प्रदर्शनाने मुलाखत संपते. (अर्थात् मुलाखत देणारांचीही गरज असते, आपले मनोगत इतरांना कळवण्याची गरज म्हणा, आपण महत्त्वाची व्यक्ती आहोत हे पुन्हा एकदा प्रस्थापित होण्याची गरज म्हणा. पण ही सगळी आतली बात. दुसरीही एक शक्यता दिसते. जेव्हा मुलाखतकार आणि मुलाखतदाता तुल्यबल असतात तेव्हा ती एक मनोज्ञ चर्चा वा विश्रब्ध वार्तालाप होऊ शकतो. उदाहरणार्थ, दोन सुप्रतिष्ठ साहित्यिकांमधला मुलाखत म्हणवणारा संवाद. हिंदीमध्ये या पहिल्या प्रकारच्या साक्षात्काराला 'भेंटवार्ता' म्हणतात, आपण त्याला भेट-मुलाखत म्हणून या. प्रकट मुलाखत हा तिचाच एक उपप्रकार (पत्रकारपरिषद् किंवा विमानतळावरची पत्रकारप्रश्नोत्तरी हे चटपटीत भाषाव्यवहार मात्र मुलाखतीच्या मूळ स्वरूपापासून दूर जातात.)

मुलाखतीचा दुसरा प्रकार म्हणजे निवड-मुलाखत. ती काहीशी तोंडी परीक्षेसारखी असते. एकजण किंवा दोघाचौघांची निवडसमिती मुलाखत घेते आणि बोलावलेला एकएक उमेदवार मुलाखत देतो. मुलाखतीचे उद्दिष्ट म्हणजे मुलाखतकाराच्या मनातली मुलाखतदात्याच्या पात्रतेबद्दलची जिज्ञासा पूर्ण करणे. या जिज्ञासापूर्तीमुळे नंतरच्या निवड-चर्चेला एक आधार मिळतो. मग ती नोकरीसाठी निवड असो की एखाद्या शिक्षणक्रमासाठी विद्यार्थ्यांची निवड असो की एखाद्या राजकीय पक्षाच्या निवडणुकीच्या तिकीटवाटपासाठी निवड असो. सामान्य संकेत म्हणजे ही मुलाखत

बरीचशी औपचारिक असेल. (फार तर या औपचारिकतेचे दडपण उमेदवारावर येऊ नये म्हणून त्याचे सुहास्यवदनाने स्वागत केले जाईल किंवा त्याच्यापुढे चहाचा कप सरकवला जाईल.) ती कमीअधिक आखीव असायला पाहिजे. (दुर्दैवाने आपल्याकडे ही जाणीव असावी तितकी दिसत नाही, परिणामी मुलाखत निष्कारण फरफटत जाते किंवा वेळखाऊ होते.) आणखी म्हणजे ती कमीअधिक खोल पाण्यात जाणारी असेल, उपलब्ध वेळ, उमेदवाराचा वकूब, किंवा संबंधित पदाचे महत्त्व याच्यावर ते अवलंबून आहे. निवड-मुलाखतीत मुलाखतदाता गरजू असतो, मुलाखतकार त्याला बोलावून त्याच्यावर अनुग्रह करीत असतो. मात्र योग्य उमेदवार निवडला जावा ही मुलाखतकाराचीही गरज असते हे विसरून चालणार नाही; यामुळेच कदाचित् कधीकधी शेवटी उमेदवाराचे आभार मानतात. पारंपरिक वधूपरीक्षा किंवा वरपरीक्षा हा एक निवड-मुलाखतीचाच प्रकार मानावा लागेल. आधुनिक वधूवरभेट हा मात्र पूर्णपणे अन्योन्यसंवाद असतो, त्यात कुणीच मुलाखत देत किंवा घेत नाही. गटचर्चा हा उमेदवार-निवडीचा एक अधिक लवचीक पण कधी कमी भरवशाचा मार्ग. जरी त्याला 'ग्रूप इंटरव्ह्यू' म्हणतात तरी ती एक प्रकारची स्पर्धा-चाचणीच ठरते, मुलाखत अशी नसते.

सगळ्यात अलीकडचा प्रकार म्हणजे पाहणी-मुलाखत. या प्रकारात शोधकर्ता किंवा शोध घेणारा पत्रकार किंवा गिऱ्हाइकाच्या शोधात असलेला विक्रेता (वा त्याचा प्रतिनिधी) हा मुलाखत घेतो. मुलाखतदाता असतो प्रातिनिधिक समाजघटक, प्रातिनिधिक नागरिक किंवा प्रातिनिधिक ग्राहक, मुलाखतीत पुरी होणारी जिज्ञासा असते प्रातिनिधिक समाजघटक मंडळींच्या विशिष्ट विषयावरच्या मतांबद्दल म्हणा, त्यांच्या आवडीनिवडीबद्दल म्हणा, त्यांनाच विशिष्ट उपलब्ध असणाऱ्या माहितीबद्दल वा हकिगतीबद्दल म्हणा. (चालू मंत्रिमंडळ टिकेल की नाही? शहरात रहायला आवडते की खेड्यात? तुमच्या जातीत मुलगी सांगून जाते की मुलीला मागणी घालतात? अपघात कसा झाला? वासुदेव बळवंत फडके तुमच्या गावात येऊन गेले होते का? असे त्या त्या विषयाशी संबंधित प्रश्न पाहणी-मुलाखतीत विचारले जाऊ शकतात.) ही जिज्ञासा-पूर्ती झाल्यावर जो पाहणीचा निष्कर्ष निघेल तो विश्वसनीय ठरायचा तर मुलाखतदात्यांचा एक नमुना-संचच बहुधा निवडावा लागतो. एखादुसऱ्या मुलाखतीवर भागवणे चालण्यासारखे नसते. अशा अनेक मुलाखती घ्यायच्या तर त्यांतली एकेक मुलाखत आटोपसर करावी लागणार. सामान्य संकेत म्हणजे पाहणी-मुलाखती बहुधा औपचारिक असतात, आखीव असतात, आणि तपशिलाचा पसारा न वाढवता जिज्ञासा नेमकी कशी पुरवली जाईल अशा प्रयत्नात मुलाखतकार राहतो.

(तुमचा देवावरचा विश्वास औपचारिक आहे की मनापासूनचा आले? तुमचा धंदा तेजीत चाललाय ना? यंदा पीक किती आणे आहे? अशा भोळसट आणि सरळ प्रश्नाला तितकेच प्रांजळ आणि विश्वसनीय उत्तर मिळणे कठीणच!) जनमत-चाचणी हा पाहणी-मुलाखतीचाच एक प्रकार मानावा लागेल. पाहणी-मुलाखतीत मुलाखतकार गरजू असतो, मुलाखतदाता त्याच्यावर अनुग्रह करीत असतो. अपवाद म्हणजे रुग्ण आणि त्याच्यावर उपचार करणारा डॉक्टर, वैद्य, हकीम यांच्यामधला संवाद. दुखण्याचे निदान होण्यापूर्वीचा हा अन्योन्यसंवाद स्वाभाविकपणे पाहणी-मुलाखतीवजाच असतो. पण हळूहळू, विशेषतः दुखण्याचे निदान उपचारकर्त्याच्या हाती आल्यानंतर, या संवादाचे उद्दिष्ट केवळ निदान करणे न राहता उपचाराची सुरुवात करणे असेही होत जाते. जी गोष्ट उपचारकर्त्याची तीच गोष्ट कौटुंबिक सल्लगाराची असू शकते. मनाचा ढळलेला तोल सावरणे, कौटुंबिक नात्यांमधला सल दूर करणे यासाठी संवाद हे साधन असते. तो खराखुरा अन्योन्यसंवाद असल्यामुळे त्याला मुलाखत म्हणता येणार नाही.

अशी ही मुलाखतीची क्रिया आणि तिचे हे तीन प्रकार म्हणजे भेट-मुलाखत, निवड-मुलाखत, आणि पाहणी-मुलाखत आपल्या समाजात लोकप्रिय झाले आहेत. (विशेषतः भेट-मुलाखत) पण अतिशय खेदाची गोष्ट म्हणजे या उपयुक्त कलेचे नीट आकलन मात्र झालेले दिसत नाही. एक तर मुलाखत ही कशासाठी याची नीट जाणीव नाही. मुलाखत म्हणजे मुलाखतकाराच्या जिज्ञासेची पूर्ती करण्याचा आणि त्यामार्फत समाजाला उपयुक्त, किंबहुना सामाजिक गरजेचे ज्ञान उपलब्ध करून घेण्याचा एक मार्ग आहे या प्राथमिक गोष्टीची आपल्याकडे जाणीव नाही. मग काय होते? सामाजिक महत्त्वाच्या व्यक्तीचे मनोगत समाजापर्यंत पोचवण्यासाठी भेट-मुलाखत नसते, तर अमुक एका व्यक्तीचे महत्त्व 'पब्लिक'च्या मनावर बिंबवण्याचा तो एक बिनभांडवली मार्ग ठरतो. मग मुलाखतदाता आधीपासून महत्त्वाचा असोनसो, त्याच्याजंवळ सांगण्यासारखे आणि इतरांनी ऐकावे असे मनोगत असोनसो, तसेच मुलाखतकार संबंधित क्षेत्रात जाणता असोनसो. सामाजिक गरज ही की त्यात्या पदासाठी लायक उमेदवाराची निवड व्हायला पाहिजे. उमेदवाराची लायकी जोखण्याचे प्रमाणपत्रे, शिफारसपत्रे, सार्वजनिक प्रतिमा, स्पर्धाचाचणी हे आणि असे अनेक मार्ग असतात. पण त्यांच्यातल्या संभाव्य उणिवा भरून काढणारा निवड-मुलाखत हा एक मार्ग. पण दिसते काय? निवड भल्याबुऱ्या कारणांखातर आधीच झालेली असते, निवड-मुलाखत हा केवळ प्रतिष्ठेचा उपचार ठरतो. निवड-मुलाखतीत पुष्कळदा मुलाखतदात्या उमेदवाराची अप्रतिष्ठा होते. मुलाखतकार जाणकार नसले तरी चालेल, ते प्रतिष्ठेचे किंवा लागेबांधे असलेले असले

म्हणजे झाले! सामाजिक वास्तव हुडकून काढण्याचे हिंडून जागेवर निरीक्षण करणे, ध्वनि-प्रकाश-चित्रे मिळवणे, दप्तरे धुंडाळून दस्तऐवजांची छाननी करणे, समाजघटकांच्या उत्स्फूर्त प्रतिक्रियांची गुपचूप नोंद असे अनेक मार्ग असतात, त्यांना पूरक असा पाहणी-मुलाखत हा एक मार्ग. पण इतर अधिक कष्टाचे मार्ग न चोखाळताच, विषयांची प्राथमिक जाणकारी न मिळवताच पाहणी-मुलाखती घेण्याची घाई करायची. निष्कर्ष तर आधीच काढून ठेवलेले असतात! त्यांना मुलाखतीच्या मदतीने तयार केलेल्या आकडेवारीच्या मखरात बसवून दिले म्हणजे झाले. मुलाखत या शोधक, प्रसंगी भेदक आधुनिक ज्ञानार्जनपद्धतीचे हे विडंबन कसे झाले? आपल्या समाजाच्या एकंदर सांस्कृतिक ढासळलेपणाचा, कोणतीच गोष्ट चोखपणे, मनापासून न करण्याच्या वृत्तीचा तर त्यात भाग आहेच, पण तेवढेच कारण नाही. आधुनिक संस्था, आधुनिक तरतुदी नीट समजावून न घेताच अंगीकारण्यातला एक अडाणीपणाही त्यात आहे. मुलाखत घेणे आणि मुलाखत देणे या दोन्ही काही प्राथमिक उद्दिष्ट धरून, काही प्राथमिक संकेत पाळून, आणि काहीएक प्राथमिक कौशल्यानिशी करायच्या क्रिया आहेत याचीच जिथे जाणीव नाही तिथे उद्दिष्टे, संकेत, आणि कौशल्ये या तीनही पातळ्यांवर मुलाखत देण्याघेण्यात विविध मनोज्ञ शक्यता असतील याचे भान कुठले असणार? चांगल्या प्रकारे मुलाखत घ्यायची किंवा द्यायची तर काही पूर्वतयारी लागते, संबंधित विषयाबद्दल काही जाण, निदान काही जाणीव लागते याचे भान असणे जरूर आहे. तसे ते नसले म्हणजे मग मंत्रिमहोदय मुलाखत देताना गोत्यात येतात, उमेदवार वास्तविक पाहता लायक असून स्वतःला नीटपणे प्रदर्शित करू शकत नाही, सामान्य नागरिक आपल्या बोलीमधला शब्द किंवा रूप न सांगता शोधकर्त्याच्या प्रमाणभाषेची नक्कल करून मोकळा होतो, अनुभवी समजला जाणारा मुलाखतकारसुद्धा भेट-मुलाखतीत स्वतःचेच पुराण सांगत बसतो, निवड-समितीवरचा तज्ज्ञ उमेदवाराला काय येते याचा शोध न घेता त्याला नर्व्हस करण्यात स्वतःला धन्य समजतो किंवा उमेदवाराने मतप्रदर्शन करताना तज्ज्ञ सभासदाच्याच मतांची कायम री ओढावी अशी अपेक्षा बाळगतो, क्षेत्रीय पाहणी करणारा शोधकर्ता आपल्या प्राथमिक अंदाजांना छेद देणारे उत्तर सामान्य नागरिकाकडून आले तर त्याच्याकडे दुर्लक्ष करतो किंवा त्याहून वाईट म्हणजे आपल्याला अपेक्षित उत्तरच त्याच्या तोंडून वदवण्याची खटपट करतो. खरे तर मुलाखत देणेघेणे जबाबदारीचे काम असल्यामुळे आयत्या वेळेच्या पूर्वतयारीखेरीज त्यासाठी आधीचे प्रशिक्षण आणि सराव असल्यास उत्तम. भेट मुलाखत घेणे, निवड-मुलाखत देणे आणि पाहणी-मुलाखत घेणे या कला आहेत याची आपल्याकडे थोडी तरी

जाणीव आहे, पण भेट-मुलाखत देणारा, निवड-मुलाखत घेणारा, आणि पाहणी-मुलाखत देणारा यांनाही प्रशिक्षण किंवा निदान डोळस सराव याची गरज असल्याची मात्र आपल्याकडे अजिबात जाणीव नाही.

अमुक एक मुलाखत घ्यायची वा द्यायची तर ती कितपत औपचारिक किंवा अनौपचारिक ठेवायची, कितपत आखीवरेखीव किंवा लवचीक, प्रसंग पाहून वळण घेणारी ठेवायची, कितपत तपशिलात किंवा खोल पाण्यात किंवा खासगी बाबीत शिरायचे अशा बाबींसंबंधी निर्णय घ्यावा लागतो, विशेषतः मुलाखत घेणाऱ्याला (कारण पुढाकार त्याचा असतो). गरजू कोणाला मानायचे, मुलाखतकाराला की मुलाखतदात्याला, याची दोघांना स्पष्ट जाणीव असावी लागते. दोघांचे सापेक्ष सामाजिक स्थान काय आणि त्यांच्यामधली परस्पर जवळीक किती आहे याचेही भान ठेवायचे असते. प्रश्न आणि उत्तर यांचेही एक व्याकरण असते. उदाहरणार्थ, 'तुम्ही ईश्वरवादी आहात की निरीश्वरवादी आहात?' असे विचारण्याऐवजी 'तुमचा देवावर विश्वास आहे की नाही?' असे विचारणे बरे. 'तुमचा देवावर विश्वास आहे की नाही?' आणि 'तुमचा देवावर विश्वास कितपत गाढ आहे?' या दोन प्रश्नांचा क्रम उलटा करून चालणार नाही. देवावरच्या विश्वासाबद्दल चौकशी करण्याअगोदर चमत्कार, ज्योतिष, नवस, संकटाला सामोरे जातानाची मनःस्थिती अशा अवांतर गोष्टींची चौकशी करून भूमिका तयार करणे कदाचित् अधिक उपयोगी ठरेल. 'माझा देवावरचा विश्वास कितपत गाढ आहे हे सांगता येत नाही बुवा, असे उत्तर आले तर मूळचाच प्रश्न दामटत राहण्यापेक्षा पुढच्या टप्प्यावर जाऊन किंवा भूमिका तयार करणारे प्रश्न विचारून नंतर केव्हातरी मूळ प्रश्नाकडे परत येणे किंवा मूळ उत्तरच अंतिम उत्तर म्हणून स्वीकारणे अधिक श्रेयस्कर आहे. प्रश्नाचे उत्तर नीट ऐकून घेणे, समजले नाही तर स्पष्टीकरण मागणे यात सौजन्याचा भाग आहेच तसाच तंत्र आणि कौशल्य यांचाही भाग आहे.

उत्तर देणाऱ्यावरही काही जबाबदारी, काही उत्तरदायित्व आहे. प्रश्न नीट समजला नाही तर उमेदवाराने तसे कबूल करून स्पष्टीकरणाबद्दल विनंती करणे दडपून काहीतरी उत्तर देऊन चान्स घेण्यापेक्षा कितीतरी बरे. (अर्थात् प्रश्नकर्त्याने योग्य तो समजूतदारपणा दाखवायला पाहिजे हे उघड आहे.) प्रश्नकर्त्याने भेट-मुलाखतीत काही गाफीलपणा दाखवला तर मुलाखतदात्याने समोरच्याला संभाळून घ्यायचे की पळवाटीतून निसटून जायचे की गाफीलपणाचा उचित लाभ उठवायचा हा धोरणाचा भाग आहे. 'नो कॉमेंट' म्हणण्याचा अधिकार राखून ठेवायचा की वापरायचा, आधीचे उत्तर आणि नंतरचे उत्तर यांमध्ये विसंगती येणार नाही अशी खबरदारी घ्यायची की

उत्स्फूर्ततेला जपायचे हा सर्व धोरणाचा भाग आहे.

संकेत, तंत्र, धोरण या पायाभूत बाबींच्या पुढे जाऊन कौशल्य, कला, बारकावे, मुलाखतक्रियेच्या वाढीव शक्यता यांचाही विचार करायला हवा. पण ते फुरसतीचे काम आहे. सध्याच्या अवस्थेत मुलाखतीला उलटतपासणी, हेटाळणी, खुशामतखोरी, चुगलखोरी, दाखवेगिरी हे आणि असले भलतेच रंग मुलाखतकार आणि मुलाखतदाते यांनी आणायला सुरुवात केली आहे. त्याला आळा बसला तरी आपण खूष आहोत. 'मुलाखतविद्या' असा एक लघुशिक्षणक्रम सुरू झाला, त्यात पायाभूत भाग आणि भेट- मुलाखत, निवड-मुलाखत, पाहणी-मुलाखत हे पर्याय या सगळ्यांची सोय लागली तरी आपण खूष आहोत. (मात्र अशा शिक्षणक्रमासाठी मुलाखतकार आणि मुलाखतदाता या दोघांनाही प्रवेश द्यायला पाहिजे.)

(परिभाषासूची: interviewer मुलाखतकार, interviewee मुलाखतदाता, celebrity interview भेट-मुलाखत, selection interview निवड-मुलाखत, research interview पाहणी-मुलाखत, group interview गटचर्चा-चाचणी, opinion poll जनमत-चाचणी)

□□□

---

भेट- मुलाख़त घेण्याची प्रथा बहुधा प्रथम अमेरिकेत एकोणिसाव्या शतकाच्या मध्यावर सुरू झाली. नंतर ती ब्रिटनमध्ये आणि इतर यूरोपीय देशात पसरली. (फ्रेंच आणि जर्मन भाषांतून 'इंटरव्ह्यू' हा इंग्लिश शब्दही या अर्थाने घेतला गेला.)

भेट- मुलाखत घेताना मुलाखतदात्याला आडवेतिडवे आणि खोचक प्रश्न विचारून सळो की पळो करण्याची पद्धत अलीकडची. ओरियाना फाल्लाची या इटॅलियन पत्रकर्त्रीने तर (१९७५ च्या आगेमागे घेतलेल्या मुलाखतींमधून) सत्ताधीश मंडळींवर जणू सूडच उगवायचे ठरवलेले दिसते. त्यानंतर पत्रकारमंडळींची बरीच भीड चेपायला लागली.

प्रकट मुलाखतीत संपादनाला वावच नसतो. पण एरव्ही वृत्तपत्र, नभोवाणी, दूरचित्रवाणी यासारख्या प्रसारमाध्यमांतूल सादर होणाऱ्या मुलाखती सामान्यत: कमीअधिक संपादित स्वरूपात क्वचित् सेन्सर-कात्री लागून, आपल्यापुढे येतात.

□□□

---

# भाषिक संज्ञापन

नीती बडवे

भाषेच्या भूमिकेविषयी आणि भाषा संज्ञापनाच्या संदर्भात मी जर्मनीत असताना एक मजेदार अनुभव आला. तिथे रेल्वेनं प्रवास करणं हा एक वेगळाच अनुभव आहे. कारण सर्वसामान्यपणे आपापल्या मोटरगाडीतून प्रवास करणारे लोकच खूप असतात. तिथे तशा सगळ्याच गाड्या वातानुकूलित असतात. पण त्यातही आय. सी. ई. म्हणजे इंटर सिटी एक्स्प्रेस या गाड्या विशेषच आरामशीर असतात. बटणानं पाठ कलंडवून शांत झोप घेता येईल अशा मोठ्या पाठीच्या खुर्च्या. काचेच्या मोठ्या आणि स्वच्छ खिडक्या. त्यांना पडदे लावलेले. डब्यात दाराजवळ, शिवाय मध्यभागी मोठ्या बॅग्ज आणि कोट वगैरे ठेवायला जागा. कार्पेटेड कॉरिडॉर्स, ध्वनिप्रदूषण जवळजवळ शून्य. प्रत्येक खुर्चीवर सामान ठेवायच्या फळीच्या खाली एक लेबल. त्यावर कोणत्या स्टेशनपासून कोणत्या स्टेशनपर्यंत ही खुर्ची आरक्षित आहे त्याची माहिती. प्रत्येक खुर्चीवर एक परिपत्रक. त्यात या गाडीचं नाव आणि प्रवासाचा मार्ग यांचा आलेख. गाडी कुठे आणि किती मिनिटं थांबणार याची माहिती. प्रत्येक स्टेशनला उतरल्यावर कुठे जायला कुठल्या गाड्यां मिळतील याची माहिती .प्रत्येक डब्यात एक स्पीकर. गाडी सुरू होताना चालकाचं स्वागतपर निवेदन. प्रत्येक स्टेशन येण्यापूर्वी स्टेशनच्या नावाचा पुकारा. चुकून गाडीला कुठे काही मिनिटं जास्त थांबावं लागलं तर चालकाचं दिलगिरीपूर्ण वक्तव्य. शेवटच्या स्टेशनात शिरताना प्रवाशांचे आभार. तुमचा पुढचा प्रवास सुखाचा होवो अशी शुभेच्छा देणं-ही सर्व व्यवस्था अगदी विमानातल्यासारखी. या रेल्वेत पेयं किंवा जेवण मात्र विमानातल्यासारखं फुकट मिळत नाही. विमानापेक्षासुद्धा अधिक सुखकर प्रवास. कारण कमी धक्के, कमी ध्वनिप्रदूषण आणि खूपच जास्त मोकळी जागा. ६-८ तासांच्या प्रवासानंतरसुद्धा जराही थकवा जाणवत नाही. असा हा प्रवास अतिशय आरामशीर खरा, परंतु अत्यंत महाग.

त्यामुळेच कंपन्यांचे बडे बॉसेस, उत्तम सुटातले टाय लावलेले पुरुष; श्रीमंती बॅग्ज्, पर्सेस घेतलेल्या, उंची कपडे केलेल्या बायका, असेच लोक अशा गाड्यांमध्ये जास्त दिसतात. प्रत्येक जण आपलं आपलं काही तरी वाचत, लिहीत, लॅपटॉपवर काम करत, एकटं एकटं खात किंवा झोपत असलेला दिसतो. सगळा डबा भरलेला आहे असं क्वचितच होतं. शिवाय हल्ली सहा-सहाचे कंपार्टमेंट असलेले डबेही फारसे नसतातच. लक्झुरी बसमधल्यासारख्या एकाच दिशेनं तोंड केलेल्या दोन-दोन खुर्च्यांची





अनुक्रमणिका

डावीकडे एक रांग आणि उजवीकडे एक रांग. मधे एक बोळ. आसनं समोरासमोर आल्यामुळे औपचारिकतेनं 'गुड मॉर्निंग' किंवा 'गुड इव्हिनिंग' असं अभिवादनादाखल म्हणण्याचाही या आसन व्यवस्थेमुळे फारसा प्रश्न येत नाही.

गाडीचा आवाज येत नाही. बाहेरचे आवाज आत येत नाहीत. विक्रेते ओरडतायत वगैरे हा प्रश्नच येत नाही. सहसा कोणी शेजाऱ्याशीसुद्धा बोलताना दिसत नाही. तशी गरजच पडत नाही. ब्रेमन-हायडेलबेर्ग हा पाच-सहा तासांचा प्रवास मी अशा जलद गाडीनं केला.

हायडेलबेर्गमध्ये असताना एकदा काय झालं....

मला जायचं होतं दोन दिवसांसाठी हायडेलबेर्गहून म्युनिकला. तसं फारसं काम काही नव्हतं. पण मैत्रिणींना भेटायला जायची खूप इच्छा होती. कुणाच्या लग्नाचा पंचविसावा वाढदिवस होता, कुणाला मुलगी झाली होती, कोणी नवी जागा घेतली होती म्हणून भारतातूनच त्यांच्यासाठी भेटी नेल्या होत्या.

स्टेशनवर जाऊन चौकशी केली. हायडेलबेर्ग-म्यूनिक एक वेळचं तिकीट १०२ मार्क इतकं होतं. म्हणजे जाऊन येऊन २०४ मार्क ! आणि हे प्रचंड पैसे होते. रुपयात मोजले तर जवळपास पाच हजार रुपये. जर्मनीमध्ये आपण अगदी थोडे दिवस असतो, तेव्हा रुपयातला हिशेब पुन्हा पुन्हा वरती डोकं काढतोच. विशेषतः मोठ्या रकमांबाबत आणि कामासाठी नसून व्यक्तिगत कारणासाठी किंवा चैनीसाठी पैसे खर्च करताना. मैत्रिणींना भेटी देण्यासाठी पैसे खर्च करायचं काही वाटत नाही, पण एकटीनंच आणि काही सामान बरोबर नसताना आरामात प्रवास करायला एवढे पैसे खर्च करायचं साहजिकच जिवावर येतं.

परत स्टेशनवर जाऊन विचारलं की याहून कमी पैशांत इथून म्यूनिकला नाही का जाता येणार? तिथल्या बाईंनी उत्तर दिलं, 'तुम्हाला कोणत्या दिवशी म्यूनिकला जायचंय यावर ते अवलंबून आहे.' मी म्हटलं, 'शनिवारी.' तिनं विचारलं 'शनिवारी कधी?' मी म्हटलं, 'सकाळी लवकर.' यावर तिनं मला संगणकातून एक प्रिंटआऊट काढून दिला. सकाळी सहाला निघणारी एक गाडी, तिचं वेळापत्रक आणि सकाळी सातला निघणारी एक गाडी, तिचं वेळापत्रक. मी विचारलं 'या गाड्यांचं किती तिकीट आहे?' तिनं सांगितलं, '३५ मार्क.' मी विचारलं, 'जाऊन-येऊन?' ती म्हणाली, 'तुम्ही शनिवारी जाऊन रविवारी परत आलात, तर जाऊन-येऊन ३५ मार्क पडतील.' मी खिडकीपासून बाजूला जाऊन तो कागद परत बघितला. त्यावर म्यूनिकपर्यंतच्या तीन-चार स्टेशनांची नावं होती आणि म्यूनिकला पोचायची

वेळ होती. माझा माझ्या कानांवर विश्वास बसत नव्हता. मी परत खिडकीशी जाऊन त्या बाईना परत दोनदोनदा तोच प्रश्न विचारला, 'फक्त जायला पस्तीस मार्क की जाऊनयेऊन पस्तीस मार्क?' त्या म्हणाल्या, 'तुम्ही रविवारी परत आलात, तर जाऊनयेऊन पस्तीस मार्क.' दोनशेचार कुठे आणि पस्तीस कुठे! मी खुशीत घरी आले आणि मैत्रिणीला फोन केला की मी शनिवारी सकाळी या गाडीनं निघून इतक्या वाजता म्यूनिकला पोचतेय.

दुसऱ्या दिवशी मी शांतपणे पुन्हा एकदा तो गाड्यांच्या वेळापत्रकाचा कागद नीट बघितला आणि मी प्रचंड वैतागलेच! मध्ये जी तीन स्टेशन्स लिहिलेली होती तिथे, म्हणजे अनुक्रमे श्टुट्गार्ट, उल्म आणि आउग्जबर्गमध्ये मला गाड्या बदलायच्या होत्या! तेही या प्लॅटफॉर्मवरून त्या प्लॅटफॉर्मवर जाऊन! आणि दोन ठिकाणी पाऊण ते एक तास इतका वेळ पुढच्या गाडीसाठी थांबायचं होतं! म्हणजे एकूण साडेतीन-चार तासांऐवजी सहा-साडेसहा तास लागणार होते आणि तीनदा गाड्या बदलायला लागणार होत्या. शिवाय त्या दिवसांत सतत पाऊस पडत होता. सगळ्या स्टेशनांतले सगळे प्लॅटफॉर्मही पूर्ण छप्पर असलेले नसतात. एकूण इतकी वैतागले, की वाटलं, जाऊ दे. दीडशे-पावणेदोनशे मार्क वाचवण्यासाठी कशाला हा एवढा खटाटोप !

पण दुसऱ्या दिवशी विद्यापीठाच्या वाचनालयात एक दिल्लीचा मुलगा भेटला. त्याला सहज म्हटलं, 'शनिवार-रविवार म्यूनिकला जातेय.' तर तो म्हणाला, 'पस्तीस मार्कच्या वीकएण्ड तिकिटावर का?' म्हटलं, 'तोच विचार करतेय, काय करावं.' त्यावर तो म्हणाला, 'मीपण गेलो होतो या तिकिटावर. गाड्या बदलायला लागल्या तरी काही त्रास होत नाही.' आणि टिपिकल भारतीय अशी एक पुस्तीही त्यानं जोडली, 'ही जर्मनी आहे म्हटलं. इथे गाड्या अगदी सेकंद ते सेकंद वेळेवर जातात. काही प्रश्न येत नाही.'

मग मी ठरवलं, चला आपणही या तिकिटावर हा प्रवास करून बघू. शिवाय श्टुट्गार्ट आणि आउग्जबुर्ग ही छान गावं आहेत. आपल्याजवळ विशेष काही सामान नसणार. ४०-४५ मिनिटं गावातून फेरफटका मारून येऊ या, हवा बरी असेल तर.

आणि त्या दिवशी हवा खरोखरच छान होती. बऱ्याच दिवसांनी स्वच्छ सूर्यप्रकाश दिसला. ऑक्टोबरच्या मध्याला दिसणारी ऑटमच्या रंगांची खरी मजा दिसत होती. सगळीकडे लाल-तपकिरी झालेली सुंदर तकतकीत पानं. प्रवास करताना मजा आली.

दीड-पावणेदोन तासांनी श्टुट्गार्टमध्ये उतरले आणि सरळ चालत गावात

गेले. वाटेत कॉफी घेतली आणि पाऊण तासाने परत येऊन घाईत आपल्या प्लॅटफॉर्मपाशी गेले, तर तिथे बोर्ड होता, गाडी काही तास लेट! तशीच परत फिरून प्लॅटफॉर्मवरच्या पुस्तकांच्या दुकानात गेले. तिथे अर्थातच फारसा रस वाटावा अशी पुस्तकं नव्हती. म्हटलं परत प्लॅटफॉर्मवर जाऊन इतर कोणत्या गाड्यांची शक्यता आहे का ते पहावं.

प्लॅटफॉर्मवर एक टी.सी. होता. त्याच्याभोवती हा गराडा. तो हात दाखवून 'त्या तिकडच्या प्लॅटफॉर्मवर लागलेली गाडी घ्या. ही गाडी रद्द झाली आहे' असं सांगत होता. लोकांची एकच झुम्मड उडाली. सगळे बायका-मुलांसह धावत-पळत टी.सी.नं दाखवलेल्या म्हणजे दोन प्लॅटफॉर्म सोडून पलीकडच्या प्लॅटफॉर्मवर गेले. तिथे उभी असलेली गाडी भरलेलीच होती. धडपडत, धापा टाकत लोक आत चढत होते. तिथे बसायला जागा नव्हती की सामान ठेवायला जागा नव्हती. बरेच लोक खुर्च्यांच्या दोन रांगांच्यामध्ये उभे. दारासमोरच्या पॅसेजमध्ये बरेच लोक उभे. सगळीकडे गलका. कोणालाच कल्पना नव्हती की ही नक्की कोणती गाडी होती आणि ती कुठे जाणार होती. मी म्हटलं, 'मला वाटतं ही गाडी उल्मला जात असावी.' कारण मला पुढची गाडी श्टुट्गार्ट-उल्म घ्यायची होती. माझ्या आसपासचे बरेच लोक माझ्यासारखेच या टप्प्याचा प्रवास करणारे निघाले. पण ही गाडी उल्मला जाणारी नव्हती! पुढच्या स्टेशनवर निवेदन ऐकायला आलं, 'उल्मला जाण्यासाठी इथे उतरून प्लॅटफॉर्म तमुकवर उभी असलेली गाडी घ्या!' तिकडे लोंढा धावला! पण मी आणि आधीच्या गाडीत माझ्यासमोर बसलेली मुलगी उतरून त्याच प्लॅटफॉर्मवर थांबलो. या प्लॅटफॉर्मच्या दुसऱ्या बाजूला जी गाडी उभी होती, तिच्यावर उल्मच्या गाडीचा नंबर होता. तेव्हा हीच आपली गाडी असं आम्ही ठरवलं. आसपास विचारलं. टी.सी.ला विचारलं. तो म्हणाला, 'निवेदन चुकीचं होतं. समोरची गाडी तुमची आहे.' तोपर्यंत पुढच्या प्लॅटफॉर्मवर गेलेली सगळी गर्दी परत आली. परत एक लोंढा, एकच गलका. प्रत्येक जण दुसऱ्याला काही तरी विचारत होतं. इकडून तिकडे लगबगीनं धावत होतं. सगळेच गोंधळलेले.

शेवटी लोक एकदाचे गाडीत चढून स्थिरस्थावर झाले. बरीचशी बाकं लक्झुरीमधल्यासारखी एका दिशेला तोंड केलेली नव्हती, तर आगगाडीतल्याप्रमाणे समोरासमोर मांडलेली होती. प्रत्येक जण दुसऱ्याला काही तरी सांगत होतं. मला पहिल्या गाडीत भेटलेली जर्मन मुलगी आणि मी समोरासमोर बसलो होतो.

तेवढ्यात आणखी एक मध्यमवयीन जर्मन बाई तिथे येऊन बसल्या आणि आपण कशा बरेचदा वीकएण्ड तिकिटावर प्रवास करतो ते सांगू लागल्या. 'मी नोकरी

करते. पण वीकएण्डला म्हाताऱ्या आईला भेटायला जावं लागतं. तिला मदत करावी लागते. वीकएण्ड तिकीट कसं सोयीचं आहे. मला तीन मुलं आहेत. त्यांनी वीकएण्ड तिकिटावर कसा बर्लिनपर्यंत प्रवास केला, पण तिथे दोन तास थांबून त्यांना परत यावं लागलं.' एक ना दोन. अनेक गोष्टी त्या बाईंनी ऐकवल्या. मग दोन मिनिटं शांतता. त्यानंतर त्या एकदम म्हणाल्या, 'चेकर आला तर काही हरकत नाही. तुमच्याकडे तिकीट नसलं तरी माझ्याकडे आहे. तुम्ही माझ्या तिकिटावर माझ्या सहप्रवासी म्हणून प्रवास करू शकता.' मी म्हटलं, 'माझ्याकडे तिकीट आहे. पण एका तिकिटावर दोन माणसं कशी प्रवास करणार?' तेव्हा मला शेजाऱ्यापाजाऱ्यांकडून 'वीकएण्ड' तिकिटाची गोष्ट आणि किस्से ऐकायला मिळाले.

या तिकिटावर फक्त ठराविक गाड्यांनी प्रवास करता येतो. याही गाड्या जरी वातानुकूलित असल्या तरी इतर आरामाच्या आणि श्रीमंती व्यवस्था इथे नसतात. त्यांना रिजनल ट्रेन किंवा शॉर्ट डिस्टन्स ट्रेन म्हणतात. थोडक्यात आपल्या लोकल ट्रेनसारख्या. लहान स्टेशनवर थांबणाऱ्या, पण हळू जाणाऱ्या आणि दिवसातून दोन-चार वेळाच धावणाऱ्या. मुंबईहून कल्याणपर्यंत एक गाडी. कल्याण ते कर्जत दुसरी. कर्जत-लोणावळा तिसरी आणि लोणावळा-पुणं चौथी. वीकएण्ड तिकिटावर असं मजल-दरमजल करत आणि फक्त रिजनल ट्रेननंच प्रवास करावा लागतो.

वर्ष-दीड वर्षापूर्वी पहिल्यांदाच हे तिकीट सुरू झालं. तेव्हा ते फक्त १५ मार्कला मिळायचं आणि पाच लोक एका तिकिटावर जर्मनीत कुठेही प्रवास करू शकायचे. पुढे हे प्रवासभाडं वाढत आता पंधराचं ३५ मार्क झालं आहे. आता एका तिकिटावर दोन मोठी माणसं आणि तीन मुलं किंवा तीन मुलांऐवजी दोन मुलं आणि एक कुत्रं इतके प्रवास करू शकतात.

पूर्वी वीकएण्डला गाड्या रिकाम्या धावायच्या आणि स्टेशनं रिकामी, भकास आणि मृतवत् दिसायची. काही वर्षांपूर्वी जर्मन रेल्वेचं खाजगीकरण झालं. त्यानंतर सुरू केलेल्या वीकएण्ड तिकिटांनी त्यात आता इतकं चैतन्य आलंय. सुरुवातीला काही लोकांनी असंही केलंय. स्टेशनवर जाऊन एक तिकीट घ्यायचं. ओळखही नसलेल्या लोकांना स्टेशनवर विचारायचं, चला आपण कुठे जाऊ या? हे तिकीट शेअर करता का? इत्यादी, इत्यादी.

यानंतरच्या गाड्यांमध्ये आणि परतीच्या प्रवासातही मला हाच अनुभव आला. समोर बसलेल्या सुखवस्तू, निवृत्त दांपत्याशी भाषा, परभाषा, जर्मन निवडणुका, युरोपिअन युनिअन, 'युरो' चलन, जर्मनीचं विलीनीकरण अशा अनंत विषयांवर दीड-





अनुक्रमणिका

दोन तास उत्तम गप्पा झाल्या. सबंध प्रवासात भेटलेल्या एकाही व्यक्तीनं माझं नाव विचारलं नाही किंवा मीही त्यांची नावं विचारली नाहीत. पण आम्ही एकमेकांशी छान गप्पा मात्र मारल्या.

हा प्रवास संपत असताना माझ्या मनात आलं, काय तो श्रीमंती घुम्म-मूक प्रवास त्या चकचकीत, अत्यंत आरामशीर अशा इंटर सिटी एक्स्प्रेसमधून! आणि या शनिवार-रविवारचा प्रवास- हा इतका बोलका, माणसांशी संपर्क आणणारा, भाषिक संज्ञापनांनी संपृक्त! आरामशीर, रिझर्वड्, सेक्युअर्ड, श्रीमंती प्रवासात माणसं माणसांची दखलच घेत नाहीत. भाषेला तिथे काही भूमिकाच नाही. या उलट या साध्या, गोंधळाच्या, भरलेल्या गाडीच्या, साध्या माणसांबरोबरच्या प्रवासात भाषाही उमलते. खुलते. इथे माणसं सहज दुसऱ्याशी संपर्क साधतात. बोलतात, बोलतं करतात. माहिती आणि अनुभवांनी संपन्न करतात. इथे भाषेची भूमिका आणि स्थान एकदम महत्त्वाचं होऊन जातं. भाषा जिवंत होते. समाजाला जिवंत करते. मनात आलं, फार बरं झालं आपण या वीकएण्ड तिकिटानं प्रवास करायचा ठरवलं ते ! ही 'वीकएण्ड तिकीट संस्कृती' काही वेगळीच होती. हा एक संपन्न अनुभव होता! तेव्हाच ठरवलं, ह्या अनुभवाची गोष्ट आपल्या 'भाषा आणि जीवन'च्या वाचकांना सांगायची. त्यांच्याबरोबर हा अनुभव वाटून घ्यायचा (की 'शेअर' करायचा? - हा शेवटचा प्रश्न पुन्हा एकदा विचारलाय तो आपला संवाद असाच पुढे चालू ठेवण्यासाठी.)

□□□

**पुणे विद्यापीठाचा परकीय भाषा विभाग, रानडे इन्स्टिट्यूट**
**पुणे ४११००४**

---

## भेट-मुलाखतीचे नवीन खूळ

या नव्या जातीच्या पत्रकारितेमधला सर्वात वाईट प्रकार म्हणजे कुणा व्यक्तीचा 'इंटरव्ह्यू' घेण्याचा प्रकार - त्यात मुलाखतकर्त्याची प्रतिष्ठा लयाला जाते, मुलाखतदात्याची अभिरूची गुंडाळून ठेवावी लागते, आणि सामान्य वाचकाच्या सहनशीलतेची परीक्षा घेतली जाते.

**LeFigaro** या पॅरिसहून निघणाऱ्या वृत्तपत्रात १८८६ च्या सुमारास व्यक्त झालेला अभिप्राय

□□□





अनुक्रमणिका

# शब्द-साध्य मानसोपचार

शं. हि. केळशीकर

## १ भाषेची थोरवी

शब्दांचा महिमा अगाध आहे. वाणीचे मानवी जीवनातले स्थान अनन्य साधारण आहे. भाषेची थोरवी थोरामोठ्यांनी गायिली आहे. प्राचीन भारतीय ऋषिमुनींनी वाणीचा ''वेद-जननी'' म्हणून गौरव केलेला आहे. इतकेच नव्हे तर, त्यांनी तिला सरस्वतीदेवीच्या स्वरूपात वंदनीय देवांच्या पंक्तीत बसविले आहे आणि तिची नित्यनेमाने अखंड अभ्यर्चना केलेली आहे.

मराठी भाषेतील श्रेष्ठ संत-कवी ज्ञानेश्वर यांनी आपल्या 'अनुभवामृता'त शब्दांना पुढील प्रशास्तिपत्रक देऊन ठेवले आहे.

''बापु उपेगी वस्तु शब्दु
जिया धरा सधर नादु''॥अनु. ६.१॥

विश्वव्यापक निराकार नाद-ब्रह्म हे शब्दांच्या आधारानेच साकार होते. श्रवणीय बोलांच्या रूपानेच ते प्रकट होते. ध्वन्यर्थयुक्त वचनांच्या आश्रयानेच ते अनुभवगम्य होते.

शब्दांच्या कल्याणप्रद कार्याची आणि प्रगाढ प्रभावाची ज्ञानेश्वरांना यथार्थ कल्पना होती म्हणून त्यांनी त्या ग्रंथात पुढील संस्मरणीय ओळी लिहून ठेवल्या आहेत.

१) शब्दु स्मरणदानी प्रसिद्धु ॥६.१२॥
२) विधि-निषेधाचिया वाटा दावितो हाचि दिवटा ॥६.५॥
३) बंध-मोक्ष कळिकाटा शिष्टु हाचि ॥६.५॥

शब्दांच्या योगे आपणास गतानुभवांचे सुफलदायी स्मरण राहते. जेव्हा आपण वैचारिक वा नैतिक संभ्रमात पडतो तेव्हा शब्दच आपल्या मदतीस धावून येतात आणि संभ्रमाच्या जागी सुव्यवस्था, अंधुकतेच्या जागी सुस्पष्ट आकलन, सचिंततेच्या जागी आत्माविश्वास निर्माण करतात. ''किंकर्म, किम्कर्म?'' असा जेव्हा पेच पडतो तेव्हा शब्द हेच दीपज्योतिवत उचित कर्ममार्गाची दिशा दाखवितात. अध्यात्माच्या क्षेत्रात, सत्यविषयक समस्या सोडविण्याच्याकामीदेखील शब्दांचे आपणांस बहुमोल सहाय्य होते. जीवात्म्यास बंधनकारक काय आणि मोक्षदायक काय, हे त्या त्या प्रसंगी ठरविते वेळी शब्दच उपयोगी पडतात. विचारांचे आणि कल्पनांचे, तत्त्वांचे आणि सिद्धान्तांचे संतवचनांचे आणि ग्रंथोक्तींचे यथोचित मूल्यमापन करण्याच्या प्रयासात सुस्पष्ट शब्दप्रयोजन हे निरतिशय सहाय्यकारी ठरते. शब्दांच्या या अशा अतुलनीय योगदानाची ज्ञानेश्वरांना

अचूक जाणीव होती. म्हणून ते सहजगत्या लिहून जातात.

''गोमटे काय शब्दाचे
एकेक वानू ?'' (६.११)

आणि आपल्या अजरामर 'ज्ञानेश्वरीत', ते प्रथमाध्यायात, शब्दप्रसवा सरस्वतीदेवीला भक्तिभावे वंदन करतात

''आता अभिनववाग्विलासिनी
जे चातुर्यार्थकलाकामिनी ।
ते शारदा विश्वमोहिनी
नमस्कारिली मिया ॥ (ज्ञाने. १.२१)

ज्ञानेश्वरांनी केलेल्या या शब्दांच्या प्रशस्तीपेक्षा अधिकतर गगनस्पर्शी गौरवारती ती कोणती असू शकेल?

सत्यलक्षी प्रगत भाषा ही तत्त्वज्ञानीय चिंतनास आणि सिद्धान्तविषयक चिकित्सेस (criticism)प्रेरणादायी ठरते, याचे प्रत्यंतर पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाच्या इतिहासात पाहावयास सापडते. प्राचीन ग्रीस देशात सोफिस्ट विचारवंतांनी आपल्या भाषानिगडीत वाक्‌चातुर्याने, ग्रीकांच्या विचारविश्वात प्रबोधनाचा कालखंड (Period of Enlighten-ment) उजळविला. त्यांनी भाषेच्या अध्ययनास वाहिलेले "Rhetoric" नामक वक्तृत्वशास्त्र विकसित केले. त्यातूनच पुढे अल्पावधीत प्लेटोची ज्ञानमीमांसा (Epistemology) आणि अरिस्टॉटलचे तर्कशास्त्र (Logic) उदयास आले. पर्यायाने, प्लेटो, ॲरिस्टॉटलची चिरंतन प्रभावशाली दर्शने आकारित झाली. एवम् भाषेचे प्रगत अध्ययन हे तेथे उत्तुंग तत्त्वचिंतनास उत्तेजनदायी ठरले.

इतकेच कशाला ! सद्यकालीन पाश्चात्त्य तत्त्वज्ञान हे 'भाषिक तत्त्वज्ञान' (Linguistic Philosophy) बनले आहे आणि तेथल्या जुन्या 'ज्ञानमीमांसे'च्या आसनावर सध्या ''शब्दार्थ -मीमांसा'' विराजमान झालेली आहे, हे तत्त्वज्ञानाच्या अभ्यासकास विदितच आहे.

## २ शब्दांच्या सामर्थ्याचे रहस्य (वाणी आणि वर्तनव्यापार)

मानवी व्यक्तीच्या वर्तनात तद्वत मानवसमूहाच्या जीवनराहणीत वाणीच्या व्यापारांचे महत्त्व अपरिमित आहे . माणसांच्या आयुष्याला बरेवाईट वळण देण्याचे सामर्थ्य शब्दांत असते. समाजाचा बरावाईट इतिहास घडविण्याची शक्ती वाणीत असते. संस्कृतीचा अदृश्य प्रवाह एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे नेण्याचे अद्‌भुत कार्य भाषेच्या माध्यमाद्वारे घडून येते.

शब्दांच्या ठायी हे सामर्थ्य कोठून येते ?




अनुक्रमणिका

हे जाणण्यासाठी मानवाच्या पिंडातील मेंदूसकट संपूर्ण मज्जासंस्थेचे कार्य साकल्याने लक्षात घेतले पाहिजे. कारण, शब्दोपयोजन करणारी वाणीची यंत्रणा ही, अन्य शारीरिक यंत्रणांप्रमाणे मज्जा संस्थेच्या अधिपत्याखाली कार्यान्वित होत असते. मज्जासंस्था ही मानवप्राण्याच्या समस्त जीवशास्त्रीय (biological) क्रिया-प्रक्रियांचे नियंत्रण करते आणि यायोगे, ती शारीरिक हालचालीत एकसंधता, मानसिक अनुभूतीत एकसूत्रता, व्यक्तित्त्वाच्या विकासात एकात्मता (integration) राखते. तिच्या नियंत्रणानुसार, वाणीचे शब्दोपयोजन व्यवहार हे व्यक्तीच्या वर्तन व्यवहारांशी निगडीत होतात.

म्हणजेच वाणीचे व्यवहार हे एकीकडे विचारादी मानसिक प्रक्रियांशी तर दुसरीकडे मज्जासंदेशादी शारीरिक प्रक्रियांशी संलग्न झालेले असतात. अमूर्त विचार, त्यांचे शाब्दिक आविष्कार, तत्संलग्न मज्जासंस्थीय व्यापार, आणि देहावयवांचे अनुरूप शारीरिक व्यवहार हे सारे परस्परांशी जवळिकीच्या नात्याने जोडलेले असतात. म्हणजेच शब्दनिगडीत मज्जास्पंदने ही देहात सर्वत्र पसरत जातात. वाणीच्या व्यापारांचा सगळ्या देहप्रक्रियांवर सामीप्य-दूरत्वाने कमी-अधिक प्रमाणात सतत प्रभाव पडत असतो. साहजिकच, सामान्यतः शाब्दिक व्यवहारानुसार शारीरिक व्यवहार घडून येतात. विचाराप्रमाणे आचार घडून येतो.

अर्थात शारीरिक प्रक्रिया या रासायनिक, आनुवंशिक, सामाजिक निसर्ग-परिसरीय आदी इतरही कारणांनी प्रभावित होतात. तत्रापि, प्रस्तुत लेखात, आपणास त्या अन्य कारणांकडे लक्ष देण्याचे कारण नाही. येथे फक्त शब्दांच्या वर्तनावरील प्रभावाचे निरीक्षण करावयाचे आहे.

मज्जायंत्रणेद्वारे, शब्दनिगडीत विचार प्रक्रियांचा आचरण व्यवहारांवर परिणाम होतो, यात शंका नाही. म्हणूनच जेव्हा विचार अनावर होतो तेव्हा वर्तनक्रिया जोशात घडून येते आणि जेव्हा विचारात संभ्रम अथवा द्वन्द्व निर्माण होते तेव्हा, देह व्यापारात कुठे ना कुठे खंड पडतो; काही ना काही गडबड, धांदल उडते. परिणामी पिंडात लहानमोठी दुखणी उद्भवतात. स्मृतीत घोटाळे होतात. उक्तीत अडथळे येतात; निद्रेत दुःस्वप्ने दिसतात. वागणुकीत नको त्या चुका होतात.

आणखी असे की, शब्द हे नुसतेच अमूर्त 'अविकारी' तरल विचारांशीच बांधले जातात असे नव्हे. ते अनुभवपरत्वे प्रक्षोभक, खळबळजनक, धरणीकंपसदृश भावना -विकारांशीही अविभाज्यरीत्या संलग्न होतात. माणूस ज्याप्रमाणे बाह्य इंद्रियगम्य वस्तूंना शब्दरूप देतो, त्याचप्रमाणे तो देहांतर्गत विविध जाणिवांनाही शब्दबद्ध करतो.

म्हणजेच शब्दांच्या मदतीने तो बाह्य वस्तू वा व्यक्ती आपल्या डोळ्यांपुढे नाचवू शकतो. त्याचप्रमाणे शब्दांच्या प्रभावाने तो आंतरिक भावना विकार ही चेतवू शकतो. शब्दांचे भावना विकारांशी अतूट नाते जडते. शब्दध्वनीवर रागलोभादींचे अवगुंठन चढते. म्हणून काही काही शब्द कानावर पडताच माणसाच्या मनात भावनांचे काहूर माजते. इतके की ते त्याच्या अनावर शारीरिक हालचालीत आणि हावभावात कळतनकळत प्रकट होते. जी भयक्रोधादी भावना एखाद्या वस्तूच्या वा व्यक्तीच्या सान्निध्यात मागे कधी काळी, अनुभवास आलेली असते तीच हादरविणारी भावना, नंतरच्या क्षणी, त्या वस्तूच्या वा व्यक्तीच्या नामनिर्देशाने पुन्हा अनुभवास येते.

अशा प्रकारे, शब्द आणि भावना, वाणी आणि मनोविकार, भाषा आणि जीवन यांच्यात जवळिकीचे नाते प्रस्थापित होते. शब्दांची शरीरव्यापारांशी, भाषेची आचरणाशी, विचार पद्धतीची जीवनसरणीशी अविभाज्य जवळीक नांदते. डोक्यात घोळणाऱ्या शब्दध्वनींचा वर्तनक्रियांवर प्रभाव पडतो. चिंतनात सळसळणाऱ्या वचनांनी आचरणाला भलीबुरी वळणे लागतात.

म्हणूनच अनुकूल वातावरणात, 'अनुकूल मनःस्थितीत, माणसांची मने जिंकता येतात आणि सदुपदेशाचा इष्ट तो परिणाम होऊन भलत्या दिशेने जाणारी पाउले सुधारणेच्या दिशेकडे वळविता येतात.

### ३ मानसोपचारात भाषेचे योगदान

मज्जासंस्थेच्या एकात्मीकरणात्मक (integration) कार्यामुळे देहाचे, मनाचे वाणीचे व्यापार एकसूत्रीपणे घडून येतात, शरीराच्या हालचालींना हेतुप्रेरणात्मक (motivation) दिशा लाभते; मनाच्या प्रक्रियांना भावना-विचारात्मक संपन्नता प्राप्त होते; वाणीच्या व्यापारांना आशयगर्भता मिळते; व्यक्तीच्या व्यक्तित्वाला वैशिष्ट्यपूर्णता येते.

तथापि प्रसंगविशेषी या यंत्रणेला असह्य हादरे बसतात आणि परिणामी व्यक्तीचे जीवन कोलमडून पडते; आयुष्य काळवंडून जाते. अनपेक्षित, धक्कादायक विषारी अनुभवांनी माणसांच्या व्यक्तित्वाला तडे जातात; संभाषणक्षमता दुबळी होते; देहावयवांच्या हालचाली विचित्र रीतीने होऊ लागतात; अंतरंगात भावना विकारांचे थैमान माजते; माणूस ठार वेडा होतो.

वेडाचार, शारीरिक हालचालीतला गलिच्छपणा, वागण्यातला विक्षिप्तपणा आचरणातला हास्यास्पद व घृणास्पद ओंगळपणा, एकूण बोलण्याचालण्यातले अपसामान्यत्व (abnormality) हे मानवी जीवनातले, खेदजनक प्रकरण आहे. सामान्य जनांस बुचकळ्यात टाकणारे ते एक कष्टप्रद कोडे आहे. सुज्ञांच्या विज्ञानप्रिय, मर्मभेदक





अनुक्रमणिका

बुद्धिचातुर्यास आव्हान देणारी ती एक गुंतागुंतीची समस्या आहे.

स्वत:च्या वा आप्तेष्टांच्या काहीना काही वर्तनविकृतीशी मुकाबला करण्याचा प्रसंग, व्यक्तीच्या आयुष्यात कधी ना कधी, कमी-अधिक तीव्र स्वरूपात उद्‌भवत असतो. चांगल्या प्रतिष्ठित माणसांतही काहीना काही विकृती असल्याचे कधीकधी दृष्टोत्पत्तीस येते. इतिहासप्रसिद्ध व्यक्तींच्याही आयुष्यातले विक्षिप्तपणाचे किस्से अधूनमधून आपल्या कानी येतात.

अशा प्रकारच्या तीव्र-सौम्य वर्तनविकृतींसंबंधाने आधुनिक मनोवैज्ञानिकांनी प्रशंसनीय संशोधन केले आहे. त्याद्वारे त्यांनी वेडाचारविषयक परंपरागत गैरसमजुतींना मूठमाती दिली आहे. तद्विषयक अंधश्रद्धांना हद्दपार केले आहे. जादूटोणा, मूठमारी, (Black Magic) चेटूक आदी थोतांडांना बाजूला सारले आहे.

वेड्या माणसांवर उपचार करण्याच्या कामी पूर्वी कठोर निर्दय, अघोरी इलाज केले जात, त्या ऐवजी सांप्रतकाळी सौम्य, सहृदय इलाज करण्यात येतात. पूर्वी धर्माच्या नावाखाली, मनोव्याधीग्रस्तांना गुरांसारखे झोडपले जात असे; त्याऐवजी सांप्रतकाळी त्यांना सौहार्दाची, व माणुसकीची वागणूक देण्यात येते. पूर्वी काही ठिकाणी प्रक्षुब्ध होणाऱ्या मनोरूग्णाला चेटकीण वा सैतानाचा सेवक समजून सार्वजनिक रीत्या, धगधगत्या चितेवर फेकून देण्यात येत असे. त्याऐवजी सांप्रतकाळी, त्यांना अनेक सोईंनी सुसज्ज अशा 'सॅनेटोरियम' मध्ये सुस्थितीत जगू देण्यात येते. पूर्वी मनोरूग्णांना सामान्यतः घाणेरड्या, अंधाऱ्या खोलीत कोंडून ठेवण्यात येत असे. त्याऐवजी सांप्रतकाळी, त्यांना प्रकाशमान वातावरणात मोकळेपणे वावरू देण्यात येते. (अर्थात्, अपवाद प्रसंगी, जेव्हा रोगी अनावर प्रक्षुब्ध होतो, तेव्हा त्यास काही काळ एकेजागी डांबून ठेवणे अपरिहार्य असते.)

सारांश, सांप्रत काळी, मानसोपचाराच्या क्षेत्रात क्रांतिकारक बदल घडून आले आहेत. मनोरुग्णावर पाशवी इलाज करण्याऐवजी शांतवनकारक इलाज करण्यात येतात. याकामी सौम्य, समजूतकारक बोधप्रद शब्दांचे साधन कुशलतेने वापरण्यात येते. अग्निज्वालांचे चटके देण्याऐवजी समंजस वाणीचे पर्जन्यबिन्दु शिंपण्यात येतात.

म्हणजेच वाणी हे एक दुधारी शस्त्र आहे. तिच्यायोगे कनवाळु तसेच क्रूर अशी परस्परविरोधी कार्ये साधता येतात. ती अशी अग्निज्वालेप्रमाणे तशीच पर्जन्यधारेसारखी वापरता येते.

तसे पाहिल्यास, अग्निज्वाला काय, पर्जन्यधारा काय, किंवा भाषाविलास काय, त्यांचा विधायक तसेच विध्वंसक कार्यांसाठी सारखाच वापर करता येतो.

अग्निज्वालेने प्रकाश पसरविता येतो, उबारा मिळविता येतो; अन्न शिजविता येते हे खरे परंतु त्याच अग्निज्वालेने जिवंत माणसाला जाळून टाकता येते; भरल्या घराची राखरांगोळी करता येते; धान्याची कोठारे भस्मसात् करता येतात. जलधारेने धान्य पिकविता येते, फुले उमलविता येतात; फलोत्पादन करता येते; तत्रापि, त्याच जलधारेने नद्यांना पूर येतो; समुद्र खवळतो, बोटी बुडतात; मानवी प्राणहानी होते. भाषेचेही तसेच आहे. तिच्या सहाय्याने भावनाविचारांना सुखद अभिव्यक्ती देता येते. सामाजिक आंतरक्रियांना (Interactions)अभ्युदयकारक चालना देता येते. ज्ञानसंपादन करता येते. चारित्र्यसंवर्धन साधता येते. धृत्युत्साह वाढविता येतो; आनंद उधळता येतो. परंतु हीच मानवी भाषा प्रसंगविशेषी जीवन उद्ध्वस्त करते; मने कुसकरून टाकते; माणसे तोडून टाकते. अंत:करणातील दया-माया आटवून टाकते. नात्यातल्या माणसांत कलहाचा भडका उडविते.

अशी भाषा ही कृष्ण -धवल -लक्षणी आहे. ती उपयोगी तशीच उपद्रवीही होऊ शकते. तत्रापि येथे आपणास भाषेच्या कृष्णच्छायेकडे लक्ष द्यावयाचे नाही. तिच्या दुरुपयोगाकडे पाहावयाचे नाही. तिच्या उपकारक उपयोजनाची महती सांगावयाची आहे. त्या दृष्टीनेच आपणास उपरोक्त आधुनिक मानसोपचाराच्या क्षेत्रातील भाषेच्या भूमिकेवर ओझरता दृष्टिक्षेप टाकावयाचा आहे. या क्षेत्रातील चालू शतकातील, लक्षणीय प्रगतीची अल्पस्वल्प ओळख करून घ्यावयाची आहे. त्या प्रगतीशी सिग्मंड फ्रॉइड (१८५६-१९३९) या ऑस्ट्रियन ज्यू मनोवैज्ञानिकाचे नाव प्रामुख्याने जोडण्यात येते.

## ४ फ्रॉइडचे ऐतिहासिक संशोधन :

### ४.१ मनोव्याधीचे मूळ 'अव्यक्त' वासना

फ्रॉइड हे मुळात वैद्यकशास्त्राचे (Medical science)अभ्यासक होते. शरीर विज्ञानात, शारीरिक प्रक्रियांच्या शास्त्रोक्त अध्ययनात, ते पारंगत होते. कारणपरत्वे ते मनोव्याधीच्या संशोधनाकडे वळले. त्यांच्या असे निरीक्षणात आले की अनेक 'केसे'समध्ये शरीरव्याधीने पछाडलेले रोगी हे मुळात अन्त:स्थ मनोव्याधींनी जर्जर झालेले असतात, या मनोव्याधी दैवी वा सैतानी कारवायांनी घडून येत नसतात, त्यांच्या मुळाशी प्रत्यक्षातील निरीक्षणगम्य, अनुभवगत कारणे असतात. निसर्गसृष्टीतल्या घटनांप्रमाणे मन:सृष्टीतल्याही घटना सुनिश्चित नियमानुसार उलगडत जातात. कोणत्याही पारलौकिक शक्तीच्या मर्जीखातर येथल्या गोष्टी घडत नसतात. तथाकथित दैवी चमत्कार हे थोतांड आहे. देवीचा प्रकोप, पिशाच्चबाधा, मृतात्म्यांचा उपद्रव वगैरे ऐकीव कथा





अनुक्रमणिका

या असमर्थनीय अज्ञानमूलक अंधश्रद्धा आहेत.

मनोव्यापारांच्या दुनियेत यदृच्छया आपोआप अकारण असे काहीही घडत नाही. येथे खोट्या योगायोगास स्थान नाही. आकस्मिकतेस वाव नाही. दैवी चमत्कारांस (miracles) जागा नाही.

म्हणजेच मानवी मन जरी वरवर पाहता, चंचल, लहरी, अनिर्बंध असल्याचे भासत असले तरी , वास्तवतेत, या मनाच्या क्रिया नैसर्गिक नियमानुसारच घडून येतात, कार्यकारणभावाच्या सिद्धान्तानुसारच त्या आविष्कृत होतात. कार्यकारण भावाच्या सिद्धातांचा अंमल केवळ जड सृष्टीतच नव्हे तर मनःसृष्टीतही चालत असतो.

म्हणजेच मानसिक आधिव्याधींच्या मुळाशी मानसिक कारणेच असतात. ही कारणे प्रायः भावनिक अन्तर्द्वन्द्वांच्या स्वरूपाची असतात. आणि ती अबोध मनाच्या पातळीवर कार्यरत असतात. शिवाय, महत्त्वाची गोष्ट अशी की त्या अबोध पातळीवर दुष्ट वासनाविकारांची खदखद चाललेली असते, कारण त्या वासना दुष्ट, गलिच्छ, अश्लाघ्य असल्याकारणाने माणूस त्यांना मनाच्या अंधाऱ्या गाभाऱ्यात ढकलून देतो. दडपून टाकतो, स्मृतीत येऊ देत नाही. पण त्या वासना बलवत्तर असल्या कारणाने, नष्ट न होता, विपरीत मार्गांनी (विचित्र स्वप्नांच्या द्वारे अथवा विकृत हालचालींद्वारे) प्रकट होतात. आत्मतृप्ती साधतात. अशा त्या प्रबळ सुखलोलुप (प्रायः लैंगिक स्वरूपाच्या ) वासनांच्या खळखळीमुळे, रोग्याच्या अंतर्यामी प्रचंड ताणतणाव, अनावर भीती, दुर्बलताजनक चिंताविकार बळवितात. जो हतबल होऊन सारासार विवेकास मुकतो; सामाजिक परिसराच्या यथार्थ आकलनास वंचित होतो; आत्मसंयमास अंतरतो, कुठल्या कुठे वहावत जातो.

**४:२ उपचार**

व्याधीचे कारण नीटपणे कळल्याविना, तिजवर कोणता इलाज करावयाचा ते ठरविता येत नाही. यास्तव मनोरुग्णाच्या व्याधीस कारणीभूत झालेल्या अंतर्गत वासनांची नीट ओळख व्हावयास हवी. व्याधिग्रस्त रुग्णाला आणि उपचारकर्त्याला या दोघांनाही ही ओळख व्हावयास हवी. रोग्याच्या अबोध मनात दडलेल्या अथवा दडपलेल्या इच्छा त्याच्या जाणिवेच्या पातळीवर आणावयास हव्यात.

पण, येथे विचित्र परिस्थिती अशी उद्‌भवते की रोग्याच्या त्या प्रच्छन्न इच्छा त्याच्या जाणिवेच्या पातळीवर येतच नाहीत. त्या त्याला आठवतच नाहीत. प्रयत्न करूनही तो त्यांजविषयी अजिबात काही बोलूच शकत नाही. नेमक्या तेवढ्या बाबतीत त्याला स्मृति भ्रंश (amnesia) होतो. त्याची वाचा बंद होते. अंतरीच्या तापदायक





अनुक्रमणिका

गोष्टी 'अव्यक्त'च राहतात.

त्या मोक्याच्या क्षणी, रोग्यास बोलते कसे करावयाचे ? यासाठी जादूटोणा, मारझोड, अंधाऱ्या खोलीतला बंदिवास वगैरे अघोरी इलाजांचा काहीच फायदा होत नाही. म्हणून या कामी फ्रॉइड यांनी आपल्या अभिनव 'मुक्त बोल' पद्धतीचा (talking out method) अवलंब केला.

### ४:२:१ मुक्तबोल पद्धती

या नव्या पद्धतीनुसार रोग्याला मोकळेपणे बोलावयास उत्तेजन देण्यात येते. मनात जे काही असेल ते, स्मरणात जे काही येईल ते, जिभेवर जे काही असेल ते स्पष्टपणे, मोकळेपणे, न कचरता, न लाजता बोलावयास, रोग्यास पूर्ण मुभा देण्यात येते.दबलेल्या विकार-विचारांना अशी मोकळी शाब्दिक वाट करून दिली की मनोव्याधीचा ताप ओसरतो, असे फ्रॉइडना मोठ्या प्रमाणावरील निरीक्षणात आढळून आले.

मनोरुग्णाचा आजार बरा करण्यासाठी त्याकाळचे मानसोपचार तज्ज्ञ हे'संमोहन'तंत्राचा (Hypnotism) वापर करीतअसत. फ्रॉइड यांनीही प्रारंभीच्या काळात, या तंत्राचा प्रयोग करून पाहिला होता. पण, हे तंत्र सदोष व निरुपयोगी असल्याचे त्यांच्या प्रत्ययास आले. अतएव त्यांनी त्या तंत्राचा अव्हेर केला; आणि त्याच्याजागी, आपली 'मुक्तबोल' पद्धती सुरू केली.

### ४:२:२ समंजस शब्द-सूचना

फ्रॉइडच्या मानसोपचार-तंत्रात, 'मुक्तबोल' पद्धतीसोबत 'समजस शब्द-सूचना' (suggestion)पद्धतीचाही अंतर्भाव होतो. मनोरुग्ण हा अंतर्यामी भावनिक प्रक्षुब्धतेने ग्रासलेला असतो. तो भयग्रस्त, चिंता-त्रस्त, संभ्रमित, विगलितगात्र झालेला असतो. या कारणास्तव, त्याच्या विकृतीचे मूळ कारण 'मुक्तबोल' पद्धतीने अतिकुशलतेने त्याच्या लक्षात आणून दिल्यानंतर त्याच्या अंतर्यामीची भीती, चिंता संभ्रम हे सारे दूर करावयाचे असते. त्यासाठी मानसोपचार तज्ज्ञ हा या सूचन-प्रक्रियेचा वापर करतो. याा प्रक्रियेद्वारे तो रूग्णाच्या मनात भीतीच्या जागी धिटाई, चिंतेच्या जागी निर्धार, आणि संभ्रमाच्या जागी आत्मसंयम रूजवितो. या रीतीने तो रुग्णास साध्या सरळ, शिष्टसंमत वर्तनास लायक करतो.

ही वर्तनसुधारणा साधण्यासाठी तज्ज्ञ रोग्याशी मित्रत्वाच्या नात्याने बोलत रहातो. तो रोग्यास समंजसपणाच्या समजावणीच्या, शहाणपणाच्या गोष्टी ऐकवितो. ज्या योगे रोग्याचा आत्मविश्वास दुणावेल आणि गतानुभवांविषयीचे त्याचे सारे गैरसमज

दूर होतील, अशा शांतवनकारक रीतीने तो रोग्याशी संभाषण करीत राहतो. अशा सहजसुलभ, मोकळ्या संभाषणाद्वारे तो रोग्याच्या मनातला भावनिक मनोगंड (complex) घालविण्याचा प्रयत्न करतो. सल्लामसलतीच्या शांत सुरात बोलून, तो रोग्यास वास्तवाचे भान मिळवून देतो; आणि शिष्टसंमत आचार -विचार पाळावयास तो त्यास हिंमत मिळवून देतो.

''तुझ्या वाट्यास जे विपरीत अनुभव आले तसले अनुभव केवळ तुझ्या एकट्याच्याच वाट्याला आले असे तू समजू नकोस. आणि तुझ्या हातून ज्या विचित्र वर्तन क्रिया घडल्या तसल्या हास्यास्पद वा घृणास्पद क्रिया केवळ तुझ्याच हातून घडल्या असे तू मानू नकोस. असले विचित्र अनुभव सगळ्यांना येतात. भल्याभल्यांच्याही हातून असले विपरीत वर्तन प्रकार घडतात. म्हणून तुला पडणाऱ्या अप्रिय स्वप्नांनी तू हबकून जाण्याचे कारण नाही. तुझ्या हातून घडलेल्या वर्तन चुकांनी तू शरमिंदा होण्याचे कारण नाही. इतर माणसे अशा गोष्टी फारशा मनावर घेत नाहीत. ती माणसे प्राप्त परिस्थितीस धिटाईने सामोरी जातात. बिकट समस्यांना धैर्याने तोंड देतात. जीवनाची लढाई प्रत्येकाला आपल्या पायांवर उभे राहून आपल्या उपलब्ध शस्त्रांनिशी लढावीच लागते. शंभर टक्के जय कुणाचाच होत नसतो आणि शंभर टक्के पराजयही कुणाचाच होत नसतो. तुलाही तुझे जीवन तुझ्या परीने जगता येणे शक्य आहे. नाउमेद होण्यातमुळीच अर्थ नाही. अशा आशयाचा सल्ला मानसोपचार तज्ज्ञ हा रुग्णाईताला देऊन त्याचे मनोधैर्य वाढवितो. रोग्याच्या मनातला वैफल्यजनक (frustration)भावनिक गुंता सोडवून तो त्याला अभ्युत्थानाची दिशा दाखवून देतो.

अशाप्रकारे, फ्रॉइड यांनी आपल्या मनोव्याधि-निवारणाच्या व्यवसायात 'मुक्त बोल' आणि 'शाब्दिक सूचना' या स्वरूपातील मानवी वाणीचे महत्कार्य साऱ्या जगाच्या निदर्शनास आणून दिले.

## ५ यूंगची 'संलग्न शब्द' पद्धती

फ्रॉइड यांच्या शब्दाश्रयी उपचार पद्धतीत, यूंग यांनी थोडी भर घातली. त्यांनीही मानसोपचारातील संमोहन पद्धतीचा अव्हेर केला आणि मनोरुग्णाला त्याच्या नेहमीच्या जागृतावस्थेत ठेवून, मनमोकळ्या संभाषणात गुंतवून, त्याच्या तोंडून विचित्र, कुपरिणामकारक (पूर्वायुष्यातील) गुपिते वदवून घेण्याचे तंत्र चालू ठेवले. पण अशावेळी दगा देणाऱ्या स्मृतीच्या अडथळ्यांना बगल देण्यासाठी यूंग यांनी 'संलग्न शब्द' पद्धतीचे नवे हत्यार उपयोगात आणले. या नव्या उपचार पद्धतीत, मानसोपचार-तज्ज्ञ एकादा अर्थपूर्ण शब्द उच्चारतो; तो शब्द कानी पडताच, त्याच्याशी संलग्न





अनुक्रमणिका

असा दुसरा जो कोणता शब्द रुग्णाच्या जिभेवर येईल वा स्मरणात उसळेल तो शब्द रुग्णाने विनाविलंब बोलून टाकावयाचा असतो. या पद्धतीने रूग्णाच्या मनात अडून राहिलेल्या पूर्वस्मृती मोकळ्या करता येतात. विस्मृतीत गेलेल्या घटना स्मृतीत परत आणता येतात. यायोगे, मनाची कोंडी करणाऱ्या भावना अबोध मनातून खेचून वर काढता येतात. आणि त्यांची प्रकट मनात आवश्यक ती शहानिशा करता येते. या परीने, पर्यायाने वर्तनात सुधारणा घडवून आणता येते.

एवम्, यूंगच्याही पद्धतीत शब्दांचे सामर्थ्य मानसोपचाराच्या कामी उपयोजण्यात येते. येथेही भाषेचे जीवनोपयोगी कर्तृत्व प्रत्ययास येते.

**६ मूल्यप्रिय वाणीद्वारे चारित्र्योन्नयन**

आधुनिक मानसोपचारविषयक उपरोक्त त्रोटक माहितीवरून, भाषेचे मानवी जीवनातले एक महत्त्वाचे कर्तृत्व सहज लक्षात येण्यासारखे आहे. जीवनविघातक गतस्मृतींची उपलब्धी होण्यासाठी आणि जीवनोद्धारक वर्तनसुधारणा घडवून आणण्यासाठी शब्दांचा सुयोग्य वापर अतिशय उपयुक्त ठरतो. असे उपयोजन करण्यासाठी अर्थातच व्यावहारिक जाणतेपणा व समंजसपणा मोलाचा असतो. अ-शिष्टसंमत भाषाहीहा निकारक भावनाविकारांशी निगडीत असते; तर-शिष्टाचारानुसारी भाषा ही उदात्त भावनांशी आणि निरामय वर्तनाशी संलग्न असते. यास्तव व्याधिमुक्त जीवनासाठी आणि व्यक्तित्वाच्या उन्नयनासाठी (sublimation) चांगल्या शब्दांचा वापर करणे हे केव्हाही हितावहच असते .

उत्तम शब्दोपयोजन हे नैतिकमूल्यांच्या जाणिवेवर अवलंबून असते म्हणजेच ''बोले तैसा चाले'' या संतोक्तीबरहुकूम जीवनक्रम उरकणे इष्ट असते. अर्थात, प्रत्यक्ष व्यवहारातले प्रसंग फारच गुंतागुंतीचे असतात. त्या प्रसंगी वर्तनात यथोचित लवचिकता ठेवल्याविना गत्यंतर नसते. तत्रापि, सर्वसाधारणपणे, नैतिक मूल्यांची कास धरणे हे सुफलदायीच असते. वर्तनाचे मानसशास्त्र आणि आचरणाचे नीतिशास्त्र या दोन्हीची ताटातूट करणे उचित नव्हे.

सारांश, भाषा ही जीवनास आरोग्यदायिनी, चैतन्य दायिनी, वरदायिनी ठरू शकते, यात तिळमात्र संशय नाही. मानसिक आरोग्य जपण्यासाठी भाषेचा वापर करणाऱ्याने सामाजिक वास्तवतेच्या भानासोबत नैतिक मूल्यांचेही भान जोपासणे जरुरीचे असते.

मूल्यप्रिय वाणीने चारित्र्योन्नयन आणि जीवनोन्नती साधता येते. हा संतजनांचा सदुपदेश आधुनिक वैज्ञानिक मानसोपचाराने समर्थनीय ठरविला आहे. उपदेशपर



अनुक्रमणिका

शब्दांच्या प्रभावाने नराचा नारायण, पाप्याचा पुण्यवान वाल्याचा वाल्मीकी झाल्याची उदाहरणे जगाच्या इतिहासात थोडीथोडकी नाहीत.

शरीराची घडण ही निसर्गदत्त देणग्यांवर अवलंबून असते; परंतु व्यक्तित्वाची घडण ही व्यक्तीच्या स्वीय प्रयत्नांवर अवलंबून असते. स्वभाव हा निसर्गदत्त असला तरी चारित्र्य हे ज्याचे त्याने घडवावयाचे असते. या चारित्र्याच्या घडणीस सुविचारसंपन्न शब्दप्रभुत्व पुष्कळ अंशी कारणी येते. नीतिपर विचार सुस्पष्ट शब्दांत डोळ्यांसमोर तरळत ठेवले की वर्तनास इष्ट वळण लागू शकते; पिंडातल्या ज्ञाताज्ञात शक्तींना चारित्र्योन्नयनाच्या कामी जुंपण्यास शब्दांचे सामर्थ्य कारणी येऊ शकते.

या संदर्भात फ्रॉइडची आणखी एक शिकवण विचारात घेण्यासारखी आहे. ती अशी की, 'सर्वसामान्य' (normal)आणि 'अपसामान्य' (abnormal)या दोहोत आपण मानतो तितकी रुंद दरी नसते. खरे म्हणजे या दोहोमधली विभाजन रेषा सुस्पष्टपणे आखताच येत नाही. बाह्यात्कारी सुदृढ भासणाऱ्या माणसामध्येही अपसामान्यत्वाचा काही ना काही अंश असतो; आणि सर्वसामान्य माणसांच्या दैनंदिन वर्तन व्यापारात असंख्य अपघात, प्रमाद, चुका घडत असतात. या प्रमाद -चुकांचे जवळून निरीक्षण केल्यास असे दिसून येते की, जी मानसिक कारणे मनोरुग्णांच्या तीव्रतर अप-वर्तनास जबाबदार असतात तीच मानसिक कारणे सर्वसामान्यांच्या दैनंदिन सौम्य प्रमादचुकांस जिम्मेदार असतात. परिणामी जी 'मुक्त बोला' ची आणि 'शाब्दिक सूचना' ची तंत्रे अपसामान्य वर्तनक्षोभात वापरता येतात तीच तंत्रे सामान्य चुका प्रमादांत वापरता येण्यासारखी आहेत. म्हणजेच 'सर्वसामान्य' आणि 'अपसामान्य' या दोहोत केवळ अंशात्मक फरक आहे; गुणात्मक भेद नाही.

थोर महाराष्ट्रीय संतकवी रामदास यांनी 'शब्दसृष्टीचे ईश्वर' असा कवींचा रास्त गौरव करून म्हटले आहे की,

''नसता कवीचा व्यापार
तरी कैसा असता जगदुद्धार'' ॥ (दासबोध १-७-२१)

संतवर्यांच्या या अनुपम पवित्र काव्यपंक्तीच्या आधारे आपणास विनम्रभावे (औचित्याचे उल्लंघन न करता) असे म्हणता येईल की,

''केल्याने शब्दांचा उचित व्यापार
होतसे व्याधिग्रस्तांचा उद्धार
तेवि सामान्यांचाही ताप-परिहार''॥

□□□

**मुंबईच्या पार्ले महाविद्यालयातून तत्त्वज्ञान व मानसशास्त्राचे प्राध्यापक म्हणून निवृत्त; सध्या वास्तव्य : ३०२ चैतन्यनिवास, फातिमानगर, सोलापूर रस्ता, पुणे- ४११०१३**

# संकलित लेखांचे फलित

**जयश्री पाटणकर**

भाषा आणि तिचा व्यवहार याविषयी सजग असणाऱ्या वाचकांसाठी मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष यांनी 'लोकसत्ते'तून (मे ९५ ते ९६) जे भाषाविषयक सदर लिहिले त्याचे 'भाषाविवेक' हे संकलित पुस्तक नुकतेच श्रीविद्या प्रकाशनाने प्रकाशित केले आहे. (१२ मार्च १९९७) यात *मराठी* भाषेशी संबंधित एकंदर ५२ लेख आहेत; निव्वळ 'भाषा' या व्यापक विषयाशी नव्हेत. तेव्हा हे लेखन मराठी भाषेसंबंधीचे आहे - आणि तेही मराठीचा बचावपक्ष घेणाऱ्या 'इंग्रजी प्राध्यापका'चे आहे हे विशेष.

या पुस्तकात राजाध्यक्षांनी मराठीसंबंधीच्या अनेक विषयांना स्पर्श केला आहे. मराठीच्या अभ्यासाविषयी शासन, विद्यापीठ व समाज यांना गांभीर्य असले पाहिजे. ती ज्ञानभाषा कशी होईल या दिशेने आपण सर्वांनी प्रयत्न केला पाहिजे. इंग्रजी, संस्कृत या भाषांचे तिच्यावर ऋण आहे पण आहे त्यापेक्षा त्यांचा वरचष्मा मराठीने अधिक होऊ देता कामा नये. जसे, शिक्षणात इंग्रजी माध्यम वापरणे, शासकीय परिभाषा संस्कृत वळणावर नेणे हे दोन्हीही या संदर्भातील धोके आहेत. तेव्हा मराठी माणसांनीच मराठीचे मराठीपण जपावे. पंण जपावे म्हणजे आत्यंतिक देशीवादी, शुद्धीवादी भूमिकाही घेता उपयोगाची नाही. इतर भाषांकडून शब्दऋण, ज्ञानऋण घ्यायला हरकत नाही - अशी राजाध्यक्षांची भूमिका आहे. मराठीला परीक्षेपलीकडे अधिक महत्त्व देऊन, ती जाणतेपणाने, गांभीर्याने ज्ञान व्यवहारात वापरून, समाजाला मराठी पुस्तके विकत घ्यायला लावून तिचा दर्जा आपण वाढविला पाहिजे. असे त्यांना वाटते. शिवाय तिचे लेखनही सोपे असावे. विशेषणांची अतिरिक्त हौस भाषेला पोकळ बनविते. ती हौस कशी सोडता येईल याविषयी त्यांनी काही उपायही दिले आहेत.

पण या लेखनामागे निश्चित अशी व्यासंगी, विद्वत्तापूर्ण भूमिका नाही. मराठी रसातळाला चालली आहे, मृतवत् झाली आहे, ती गुदमरतेय - अशा ज्या बातम्या आहेत त्यांना एक प्रकारे वृत्तपत्रीय आश्वासक उत्तर देण्याचा हा प्रयत्न आहे. यासाठी लागलेली साधनसामग्री, संदर्भ, तळटीपा सदरलेखनात सादर केलेल्या नाहीत. पण संकलित पुस्तकात मात्र असायला हव्या होत्या असे वाटते. कारण पुस्तक आता वृत्तपत्रीय चटपटीत सदरे वाचणाऱ्या वाचकवर्गापुरते राहिलेले नाही. ते मराठी भाषेसंबंधी गंभीर चर्चा करणाऱ्यांसाठी आहे हे लक्षात घेऊन संदर्भ देणे आवश्यक होते असे वाटते. याचा परिणाम, राजाध्यक्षांचे प्रश्न हे निव्वळ हवेत वार केल्याप्रमाणे राहतात. उदाहरणार्थ, पहिल्या तीन पृष्ठांवरील उदाहरणेच फक्त पहा-

पृ. १ - 'सध्या (१९९५) थंडावलेल्या मराठी-कोकणी वादाला कोण फुंकर घालत आहे?' पृ. २ - 'तुळु भाषेत इंग्रजी भाषेचे मूळ आहे असा दावा कोणत्या तुळु विठोबाने केला? मराठी ही संस्कृतची जननी असे कोणत्या महानुभावाने म्हटले?' पृ. ३ ''-'संस्कृत ही राष्ट्रभाषा करावी' अशी घोषणा कोणी केली?'' या आणि अशा प्रश्नांचे कर्ते कळल्यास त्यांची त्यामागील भूमिका समजून घेता येईल व आपली त्यांना समजावून देता येईल. यामुळे चटपटीतपणा टाळून मूळ प्रश्न सोडवायला मदत होईल.

दुसरे असे की, लेखकाने अनेक महत्त्वाच्या प्रश्नांना स्पर्श केला आहे, पण तो जाता जाता - म्हणजे अनेक वेळा लेखाच्या शेवटी शेवटी. उदाहरणार्थ, चौथ्या लेखाच्या शेवटी प्रश्न आहे - 'संस्कृत देवांची, इंग्रजी भूदेवांची. मराठीचा काय अधिकार?' १९६० नंतर मराठी राजभाषा होऊनही ती सरकारची, विद्यार्थ्यांची, ज्ञानाची भाषा होऊ शकली नाही या पोटतिडिकीतून हा प्रश्न आला आहे हे खरे. पण असा निरुत्तर करणारा प्रश्न टाकून, आधीच मराठीच्या चिंतेने ग्रासलेल्या माणसाला राजाध्यक्षांनी आणखीनच बुचकळ्यात टाकले आहे. 'मराठी ही दलितांची भाषा' असे नाईलाजाने सांगण्यापेक्षा ती उपेक्षित, दुर्लक्षित, दुर्बल स्तराची भाषा असली तरी त्यात कोणते सामर्थ्य आहे, मातृभाषा असल्यामुळे आपल्याला जे स्वाभाविक प्रेम वाटते, त्याचा फायदा घेऊन ती ज्ञानभाषा, व्यवहारभाषा कशी होईल याचा अधिक विचार राजाध्यक्षांनी करायला हवा होता. 'ती दलितांची' असे उत्तर देऊन भागणारे नाही.

महाराष्ट्रात एकंदरीत अजूनही मराठी व इंग्रजी संबंधी नीच-उच्च भाव आहे. तो जावा असे वाटत असेल तर तौलनिक साहित्याभ्यास व्हावा असे राजाध्यक्ष एकविसाव्या लेखाच्या शेवटी सांगतात. पण असा तौलनिक अभ्यास इंग्रजीसंबंधीच नाही तर भारतातल्या अन्य भाषांसंबंधीही व्हायला हवा त्यामुळे भाषाभाषांत देवाणघेवाण होईल - त्या समृद्ध होईल. पण आपल्याकडे शेजारच्या भाषासंबंधीही तौलनिक अभ्यास आहे का असा प्रश्न राजाध्यक्ष विचारतात. या प्रश्नाचे उत्तर 'नाही' असे दिल्यास त्यासाठी काय करता येईल ते सांगावयास हवे होते व उत्तर 'होय' असे दिल्यास उदाहरण द्यावयास हवे होते. याचा अर्थ राजाध्यक्ष प्रश्नाचा खोलात जाऊन शोध घेत नाहीत.

आज संस्कृतवर जसे दुर्दैव ओढवले आहे तसे मराठीवरही - या मताशी राजाध्यक्ष सहमत आहेत. संस्कृत घेऊन काय करणार हा जसा प्रश्न आहे तसा मराठी



अनुक्रमणिका

घेऊनही काय करणार, हा प्रश्न शिल्लक राहतो. या प्रश्नाचा राजाध्यक्षांनी सखोल विचार करावयास हवा होता. समाजाला एखाद्या विषयाची उपयुक्तता जोपर्यंत पटत नाही तोपर्यंत तो विषय अभ्यासला जात नाही. आज मराठीविषयी आस्था असणाऱ्या, जाण असणाऱ्या विचारवंतांनी समाजात मराठीचा व्यवहार कसा वाढेल, तो कसा उपयुक्त आहे, कोणकोणती क्षेत्रे मराठीचा अभ्यास केल्याशिवाय पादाक्रांत करता येणार नाहीत ते सांगायला पाहिजे. उदाहरणार्थ, पत्रकारिता हा नवा वाढता व्यवसाय आहे. पण तेथे मराठीची आवश्यकता किती असते? किंवा मराठी घेऊन बी.ए., एम.ए. झालेले कितीसे लोक पत्रकारितेच्या क्षेत्रात शिरतात? किंवा मराठीच्या अभ्यासक्रमात पत्रकारितेच्या क्षेत्रातले कितीसे ज्ञान शिकविले जाते? तेव्हा अभ्यासक्रम नव्याने बनविले पाहिजेत. ते उपयुक्त ठरले पाहिजेत. त्यासाठी तसा व्यवहार वाढविला पाहिजे. कायद्याची भाषा, उच्चशिक्षणाची भाषा, मराठी भाषा जर झाली तर ती अधिक समृद्ध होईल. तसा रेटा आपण लावला पाहिजे..

थोडक्यात अशा संकलित लेखांचे फलित काय? एक तर वाचक बहुश्रुत होतो. उदा. इंग्रजी भाषेत दुर्बोध विषयावर अनेक सुबोध पुस्तके आहेत तसे मराठीत व्हायला हवे असे सांगताना लेखक पेंग्विनचा दाखला देतात. पेंग्विनने अवकाशातील ग्रहमालांपासून पृथ्वीच्या पोटात दडलेल्या पुरातन संस्कृतीच्या अवशेषांपर्यंत, तो विषय अभ्यासका जात नाही. दुसऱ्या महायुद्धाची पार्श्वभूमी व त्याचे परिणाम या विषयांवर अत्यंत सुगम भाषेत आणि अत्यंत स्वस्त किंमतीत पुस्तके देण्याचा विक्रम केला आहे. पेंग्विनप्रमाणे विल् ड्यूरंटचे Story of Philosophy, बर्ट्रंड रसेलचे History of Western Philosophy, एच्. जी. वेल्स्चे Work, Wealth and the Happiness of Mankind हे अर्थशास्त्रावरील पुस्तक - अशा उदाहरणांनी वाचकाच्या माहितीत भर पडते. बऱ्याच वेळा जुन्या आठवणी, जुने लेखक, पत्रकार, अभ्यासक्रम यांचा आठव काढला जातो पण ही सर्व उदाहरणे जुन्या काळातील आहेत. आजच्या वाचकाला ती पुस्तके मिळविणेही कठीण तेव्हा दिले गेलेले संदर्भ अधिक अद्ययावत असायला हवे होते असे वाटते.

दुसरे फलित लेखकवर्गासाठी. लेखकांनी चित्रकार, संगीतकारांप्रमाणे परिश्रम केले पाहिजेत; रियाझ केला पाहिजे. नित्य लिहून लिहून लेखन क्षमता वाढते. यासाठी लेखकाने दिलेली उदाहरणे मात्र पाश्चात्यच आहेत. प्लेटो, टॉमस ग्रे, एडमंड बर्क, अर्नेस्ट हेमिंग्वे, जोजफ कॉन्रॅड इत्यादी. या यादीत पेंडसे, अनिल अभावानेच. मराठी भाषेचा कैवार घेणाऱ्या राजाध्यक्षांनी मराठीतील अशी उदाहरणे शोधून द्यावयास हवी होती. त्यामुळे मराठी लेखकांनाही उभारी आली असती. इंग्रजी नावे केवळ





अनुक्रमणिका

'ठेवणीसाठी' उपयुक्त असतात.

तिसरी गोष्ट म्हणजे अनावश्यक विशेषणांची साखळी वापरण्याचा हव्यास सोडला पाहिजे हे राजाध्यक्षांचे सांगणे. ही गोष्ट खरीच आहे. विशेषणांच्या अति-वापरामुळे भाषा अनावश्यक फुगते. पुढे पुढे त्यात गांभीर्य राहत नाही आणि मग त्यात फक्त चलनी, तात्कालिक विषयच चर्चिले जातात. त्यांत खोली व शाश्वतता येत नाही.

राजाध्यक्षांचे हे म्हणणे खरे आहे. पण मलपृष्ठावर वि. गो. कुलकर्ण्यांनी जो विशेषणबाज अभिप्राय दिला आहे तो तरी या पुस्तकाला जोडायला नको होता असे वाटते. यामुळे राजाध्यक्षांना जे होऊ नये असे वाटत होते तेच झाले आहे. उदाहरणार्थ मलपृष्ठावर विधान आहे 'चोखंदळ रसिकता, मर्मज्ञ बुद्धी, साठ वर्षांचा व्यासंग---' वगैरे वगैरे. आता जी रसिकता असते ती चोखंदळ असल्याशिवाय रसिकता कशी होऊ शकेल? तो तिचा आवश्यक गुणधर्म आहे. तीत तो अंतर्भूतच असतो. बुद्धीही मर्मग्राही असते. त्यासाठी वेगळे विशेषण लावायची काय गरज? यामुळे मूळ शब्दाचे अर्थमूल्य कमी होते. व्यासंगाला साठ वर्षांनी जोड दिली आहे. व्यासंग हा व्यासंगच असतो. तेव्हा 'राजाध्यक्षांचे लेखन खुसखुशीत आहे' एवढे म्हटले असते तरी पुरेसे होते. ते पुरेसे नाही म्हणूनच या विशेषणांची मालगाडी लावली असेल का?

शिवाय अभिप्रायलेखकाची भाषाच गोंधळ वाढविणारी आहे. भाषेचे पैलू हे तिचे घटकच असतात. जसे शब्द, रुपके, प्रतिमा, रचना इत्यादी, पण विवेचनाची भाषा, संभाषणाची भाषा - हे तिचे उपयोग असतात, पैलू नव्हेत. भाषेचे उपयोग-सामर्थ्य वाढवावयाचे असेल तर तिचा वापर अधिकाधिक क्षेत्रात झाला पाहिजे. तो करताना, भाषाघटकांकडे, पैलूंकडे लक्ष द्यावे लागते. ते घडत, वाढत जातात रूळतात. मात्र हा ग्रंथ काही भाषेच्या पैलूंचे दर्शन घडवीत नाही (घडत असेल ते त्यांच्या शैलीचा एक भाग म्हणून - उद्देश म्हणून नव्हे.) तसेच वापराविषयीच्या शक्यताही सांगत नाही. फक्त मराठी भाषकाला भेडसावणाऱ्या प्रश्नांची जाणीव करून देतो. यातून मार्ग आपला आपणच काढावयाचा आहे. हा आयता 'विवेक' नाही. भाषा या जातिवाचक संकल्पनेचा विवेक नाही तर मराठी भाषकांनी काळानुरूप सोडवावयाचे ते गणित आहे.

**(भाषाविवेक - मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष श्रीविद्याप्रकाशन - पुणे ३०/प्र. आ. १२ मार्च १९९७/किंमत २००रु.)**

□□□

**'माधुरी', शिखरेवाडी,**
**नाशिक रोड - ४२२१०१**



अनुक्रमणिका

# चतु:पथिचे गणेश

ब्रह्मानन्द देशपांडे

स्वत:चे चित्त आणि प्राण परमेश्वराला अर्पण केलेले भक्त सतत त्याचेच नामसंकीर्तन करीत एकमेकांच्या संगतीत आनंदाने कालक्रमणा करीत असतात. त्या भक्तमेळ्याविषयी श्रीमद्‌भगवद्‌गीतेत

मच्चित्ता मद्‌गतप्राणाः बोधयन्तः परस्परम् ।
कथयंतश्च मां नित्यं तुष्यंति च रमंति च ॥

अध्याय १०, श्लोक ९,

असा भगवंताचा अभिप्राय येतो. यावरील श्रीज्ञानेश्वरमाऊलींच्या भाष्यात पुढील ओवी आली आहे.[१]

तैसें प्रयाग होत सामरस्याचें ।
वरि ॐ साण तरंगत आहे सात्त्विकाचें ।
**ते संवाद चतु:पथिचें ।**
गणेश जाले ॥

संतांचा हा ईश्वरभक्तीत रमलेला मेळावा सर्वांना शुभदायक असतो म्हणून श्रीज्ञानेश्वरांनी त्यांच्यासाठी चौकातील गणेश (चतु:पथिचे गणेश) अशी उपमा उपयोजिली आहे. अर्थात् माऊलींना या उपमेत चौकात प्रतिष्ठापित केलेली गणेशमूर्ती अभिप्रेत आहे.

## अंबाजोगाईतील चौबारा गणेश

मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील अंबाजोगाई हा गाव प्राचीन अवशेषांनी समृद्ध आहे. येथे सेऊणदेशकर यादव नृपती सिंघणदेव प्रथम याचा,[२] परमार नृपती उदयादित्यदेव याचा[३] आणि देवगिरीकर यादव नृपती सिंघणदेव द्वितीय याचे चार[४] असे एकूण सहा शिलालेख सापडले आहेत.

यापैकी यादव नृपती सिंघण देव द्वितीय आणि त्याचा प्रबल प्रतापी सेनापती खोलेश्वर यांचा एक शिलालेख हा गावातील रविवार पेठेतील चौबारा मंदिरात पश्चिमेकडील भिंतीवर कोरलेला आहे. या मंदिराला चार दिशांना चार दारे होती. म्हणून त्यास चौबारा मंदिर म्हणतात. अशा प्रकारच्या वास्तूंना राजस्थानात चौबाराडेरा म्हणतात. या शिलालेखात चारी बाजूंनी दारे असलेल्या या गणेशमंदिराचे वर्णन येते ते असे :

यत्र भाति नभोबिंबचुंबि लंबोदरालयम् ।
चतु:पथे पथश्रान्तैः सार्थैरानिशमाश्रितम् ॥१०॥

येथे आकाशाला भिडणारे गणेश मंदिर चौकात शोभत आहे.
मार्गक्रमणाच्या श्रमाने दमलेले वाटसरू तेथे अहोरात्र विश्रांती घेत असतात.
श्री ज्ञानेश्वर माऊलीना अभिप्रेत असलेला हाच तो चतु:पथीचा गणेश.

**सर्वतोभद्र प्रतिमा**

गावातील अथवा गावाबाहेर दोन मार्ग जेथे परस्परांना छेदतात अशा चौकात गणेशाचे मंदिर असे. चौकांसाठी प्राचीन शब्द चौबारा असा आहे. त्याचा वापर पंचोपाख्यान या प्राचीन मराठी गद्य ग्रंथात आढळतो.[५] असे गणेश मंदिर चारही बाजूंनी उघडे असे. आतील मूर्तीही चारही बाजूंनी घडविलेली- चतुर्मुखी-असे. अशा प्रतिमांना सर्वतोभद्र प्रतिमा अथवा प्रतिमा सर्वतोभद्रिका म्हणतात. जैनमंदिरांच्या प्रांगणातील मानस्तंभाच्या शीर्षभागावर पाठीला पाठ लावून बसलेल्या चार तीर्थंकर प्रतिमा असतात. पुष्कळदा या स्तंभाच्या शीर्षभागावर चारी बाजूंनी उघडे असे छोटेखानी मंदिर असते आणि त्यात ही सर्वतोभद्र प्रतिमा असते. पुष्कळदा, शिवालयासमोर ज्याप्रमाणे नंदीमंडप असतो, अगदी तसेच चोहोबाजूंनी उघडे छोटेसे देऊळ जैनमंदिराच्या प्रांगणात असते आणि त्यात तीर्थंकराची सर्वतोभद्र प्रतिमा असते. असा प्रतिमायुक्त मानस्तंभ आणि प्रतिमा-देऊळी वेरुळलेणी समूहात लेणे क्रमांक ३० मध्ये आहे.

**महानुभावीय साहित्यातील उल्लेख**

महानुभाव साहित्यात तर चौबारा मंदिराचे आणि त्यातील चतुर्मुखी गणेशविग्रहाचे अनेक उल्लेख येतात. ते असे-

अ. पैठण हे यादवकाळातील विशाल आणि शोभिवंत नगर होते. या नगरात अनेक चौक असावेत आणि त्यात सर्वतोभद्र प्रतिमायुक्त गणेशमंदिरेही असावीत. त्यातील एका चौबारा मंदिरात श्रीचक्रधर प्रभूंचे वास्तव्य झाल्याचा आणि तेथे त्यांनी बाईसांच्या पायातील काटा काढल्याचा उल्लेख लीळाचरित्रात येतो.[६] येथूनच स्वामींनी वृद्धासंगमाच्या दिशेने प्रयाण केले.

ब. साऊर (ता. जि. अमरावती) येथे बाळसमुद्र नामक मोठ्या बारवेजवळ चौबारा गणेशाचे स्थान असावे असे लीळाचरित्रातील निर्देशावरून वाटते. (लीळाचरित्र,पूर्वार्ध लीळा १६२).

क. ऋद्धिपुर येथील तीन चतुर्मुख गणेशप्रतिमांच्या चौबारा मंदिरांचा उल्लेख चौतोंडा गणेश या संज्ञेने स्थानपोथीत येतो.[७] यातील एक चौतोंडा गणेश ऋद्धिपुरात अद्यापही पाहायला मिळतो. तो ग्रामपंचायतीच्या पाण्याच्या

टाकीजवळ पोहकरपुऱ्यामध्ये आहे.

ड. महानुभाव पंथीयांचा तीर्थराज डोमेग्राम ते नेवासे या मार्गावर चौबारा गणेश मंदिर होते. तेथे श्रीचक्रधर स्वामी विश्रांतीसाठी थांबले होते.[८] हे मंदिर नेवासे गावाच्या अगदी सीमेवर असावे कारण यानंतर स्वामींचे वास्तव्य लगेच नेवासे येथील कुसुमेश्वराच्या मंदिरात झाले.

इ. चौबारा मंदिर हे विश्रांतिस्थान असल्याचा निर्देश रवळोव्यास यांच्या सह्याद्रिवर्णन[९] या काव्यातही येतो.

फ. भास्करभट्ट बोरीकरांनी आपल्या शिशुपालवध या काव्यात द्वारकेच्या बाजारपेठेचे वर्णन करताना तेथील हाट-चोहटातील चौबारे गणेश मंदिरावर

नवरत्नाचा चौबारा : पद्मरागाचे लंबोदर
नाटारंभी साडंबर : नाचत दिसती
अशी बहारदार ओवी लिहिली आहे.[१०]

विदर्भात यवतमाळ जिल्ह्यातील कळंब येथे ही गणेशाची चतुर्मुख प्रतिमा आहे. ज्ञानेश्वरीच्यां लेखनस्थळाचे भाग्य लाभलेल्या नेवासे नगरीच्या सीमेवरच चौबारा गणेशमंदिर होते. ते समाजजीवनाचे साक्षेपी निरीक्षण करणाऱ्या श्रीज्ञानेश्वरमाऊलींच्या नजरेतून सुटते तरच नवल. त्यांनी एका अतिशय सरस, सुरम्य आणि चपखल उपमेत त्याचा सहज वापर केला.

## यक्षपूजेचे अवशेष

प्राचीन काळी (इ. स. पू ६०० ते इ. स. ३००) यक्षपूजेला विशेष बहर आला होता. नगरद्वारावर आणि नगरातील चौकात विशाल यक्षप्रतिमा असत. त्या बहुधा मोकळ्या ओट्यांवर असत. 'उत्थिताः आसकाः वैश्रवणस्य' असा उल्लेख पतंजलीच्या महाभाष्यात येतो. नगरद्वारावर आडव्या तुळईवर यक्षमूर्ती असत. 'सिद्धिविनायकमंडित यक्षद्वारे' असा स्पष्ट उल्लेख राष्ट्रकूट नृपती कृष्ण तृतीय याच्या कंधार (जि. नांदेड) येथील शिलालेखात येतो.[११] गणपति हा मूलतः यक्षच आहे. तेव्हा यक्षाचे द्वारपट्टिकेवरील आणि बाजारातील चौकातील स्थानावर तो विराजमान झाला असे दिसते.





अनुक्रमणिका

संदर्भ :
१. श्रीज्ञानेश्वरी, महाराष्ट्र शासन प्रत, अध्याय १० ओवी १०८.
२. ब्रह्मानंद देशपांडे. शोधमुद्रा खंड १ ला. पृ. २३-३५.
३. तत्रैव. पृ. ११५-१२५.
४. ग. ह. खरे. दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने, खंड १ ला, पृ. ५५-७६.
५. पंचोपाख्यान (सं.) वि. भि. कोलते. पृ. ७२
६. म्हाइंभट. लीळाचरित्र (तृतीय आवृती.)सं.वि.भि. कोलते. उत्तरार्ध लीळा ५२८
७. स्थानपोथी (सं.) वि.भि. कोलते (द्वितीय आवृत्ती). पृ. ८१, ८५.
८. लीळाचरित्र. उत्तरार्ध लीळा क्र. २२२-२३.
९. रवळोव्यास सह्याद्रिवर्णन (सं.) वि. भि. कोलते. ओवी. ४७३.
१०. भास्करभट्ट बोरीकर. शिशुपालवध. (सं) वि. भि. कोलते ओवी ३३५
११. Epigraphia Indica. xxxv., pp. 105.

□□□

**'ऐतिहासिक' १४ अनुपम वसाहत,**
**श्रेयनगर, औरंगाबाद -४३१००५**
**दूरध्वनी: ०२४० ३३६६०६**

---

**भेट-मुलाखत म्हणजे ऐतिहासिक दस्तऐवज**

आपले कार्य बरोबर ओळखून असणारा मुलाखतकर्ता हा मुलाखतदात्याच्या मनाचा ठाव घेतो, मुलाखतदात्याचे समाजाला खरोखर दर्शन करून देतो, तो काही बिचाऱ्याच्या मालमत्तेच्या लिलावाची बोली पुकारत नाही दर हजार शब्दांना इतकाइतका तपशील म्हणून ! खरा मुलाखतकार आपल्याला सद्य:कालीन इतिहासाचा अव्वल दस्तऐवजच भावी पिढीला पुरवीत असतो.

रेमंड ब्लॅथ्वेट हे सी. ई. मॉरलँड यांना 'मुलाखतीची कला' या विषयावर घेतलेल्या मुलाखतीमध्ये सांगत आहेत (ग्रेट थॉट्स, ११ जून १८९२ चा अंक)

□□□

# शिवमुष्टिगंडु

**ब्रह्मानंद देशपांडे**

श्रीमद्भगवद्‌गीतेतील तेराव्या अध्यायातील

अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।
एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतो ऽ न्यथा ॥१२॥

या श्लोकावर भाष्य करताना श्रीज्ञानेश्वरमाऊलींनी उण्यापुऱ्या २४७ ओव्यांचा प्रपंच केला आहे. पराकोटीच्या अज्ञानाचे लक्षण सांगताना माऊली म्हणतात,

म्हणे मीं चि येकु आथि । माझां चि घरिं संपत्ति ।
माझी आचरति रीती । कोण्हासि बाहि ॥६१५॥
नाही माझेनिं पाडें वाडु । मी चि सर्वज्ञु एकु रूढु ।
ऐसा **शिवमुष्टि गंडु** । घेऊनु ठाके ॥ ६१६॥

येथे **शिवमुष्टिगंडु** हा गंड (complex)वाचक शब्द आला आहे. पराकोटीचा गर्व, अहंमन्यता (megalomania), स्वतःला अतिश्रेष्ठ समजणे हाच अर्थ माऊलींना अभिप्रेत आहे हे स्पष्टच दिसते.

**पाठभेद**

ज्ञानेश्वरीच्या प्राचीन प्रतकारांना हा शब्द नीट माहीत असावा. तरीपण काहींना त्याच्या अर्थाचा नीट उलगडा न झाल्याने त्यांनी तो बदलून लिहिला आहे. शाळिग्राम, गोपाळश्रम, निरंजन रघुनाथ, ज्ञानदेवी (माडगांवकर प्रत) यांमध्ये मात्र **गर्वतुष्टिगंडु** आणि कुंटे प्रतीत **सर्वतुष्टीगंडु** असे पाठभेद आहेत.[१] ते अगदी उघडपणे नंतरचे आणि ओव्यांच्या अर्थाच्या अनुरोधाने बनविलेले दिसतात. ते जरी मूळ आणि खरे पाठ असल्याचे गृहीत धरले तरी शिवमुष्टिगंडु हा पाठभेद उरतोच आणि त्याचा नेमका अर्थ काय हाही प्रश्न उपस्थित होतोच.

**कोशातील अर्थ**

या शब्दाच्या अर्थाविषयी कोशकारही संभ्रमितच आहेत. 'श्रीज्ञानेश्वरी शब्दार्थकोश' या ग्रंथाचे कर्ते शिवाजी नरहर भावे लिहितात,[२] 'शिवमुष्टिगंडु याचा अर्थ लागत नाही.' तर 'ज्ञानेश्वरीचें शब्दभांडार' या सुप्रसिद्ध कोशाचे संपादक रा. ना. वेलिंगकर लिहितात[३]

> ''या पाठाचा अर्थ नीट लागत नाही. विवाहोत्तर
> नववधूने पाच वर्षे 'शिवामूठ' दान करणे हा अर्थ
> या संदर्भात बसत नाही.''





अनुक्रमणिका

अरविंद मंगरुळकर आणि विनायक मोरेश्वर केळकर यांनी संपादित केलेल्या 'ज्ञानदेवी' चे प्रकाशन मुंबई विद्यापीठाने केले आहे. डॉ. सरोजिनी वैद्य यांचे अथक परिश्रम त्या मागे आहेत. तेथे ही ओवी ७१६ क्रमांकावर असून तिचा पाठ, अन्वय आणि अर्थ खालीलप्रमाणे आहे.

संहिता : नाहिं माझेनि पाडें वाडुः मी चि सर्वज्ञु एकु रुढुः
ऐसा शिवमुष्टिगंडुः घेऊन ठाके ॥

अन्वय : माझेनि वा पाडे वाडु नाहिं । मी चि सर्वज्ञु, एकु, रुढु,
ऐसा शिवमुष्टिगंडु घेऊन ठाके

अर्थ : माझ्यासारखा मोठा (दुसरा कोणी) नाही, मीच सर्व जाणतो, मी एकमेवाद्वितीय आहे. मी प्रख्यात (आहे) असा शिवभक्ताचा (म्हणजे त्याप्रमाणे) गर्व धारण करून उभा असतो.

हा अन्वय आणि अर्थ अगदी गोळाबेरीज आहे हे तेव्हाच जाणवते. शिवाय अगदी कसलाही संबंध नसताना हा शिवभक्त कोठून आला आणि त्या बिचाऱ्यावर गर्वाचा आरोप का झाला हे समजत नाही. शिवभक्ताप्रमाणेच नववधू विवाहोत्तर पाच वर्षे जीं शिवामूठ वाहतात त्याचाही इथे संबंध नाहीच.

**संभाव्य अर्थ**

धान्य, दूध, तेल अगर तत्सम पदार्थ मोजून देताना किंवा घेताना माप पूर्ण झाल्यावर मूठभर धान्य परिपूर्णता येण्यासाठी, संशय नको म्हणून पूर्णतेपेक्षा अधिक म्हणून टाकतात. तिला पस्तुरी, वाढवा असे शब्द आजही प्रचलित आहेत. द्रवपदार्थ (दूध वगैरे) असल्यास या पूर्णत्वापेक्षा अधिक देण्याला धार म्हणतात. खेड्यात हा प्रकार सार्वत्रिक आहे.

यासाठी शीग, शिगोशिग देणें असेही म्हटले जाते. शिग आणि शिव यात साम्य दिसते. 'व' चा 'ग' होतो. जसे वृत्त > **गिर्द** > ग्रीद गोल फिरणे, फेऱ्या घालणे, पहारा करणे.[४] शिव चे शिग झाले असावे काय?

याचेअर्थाने विदर्भ भागात भद्रमूठ(उच्चारी भदरमोट, भदरमोठ) असा शब्द प्रचलित आहे. भद्रमूठ आणि शिवमूठ (मुष्टि) हे शब्द समानार्थकच आहेत. तेव्हा 'परिपूर्ण', त्यापेक्षा अधिक (more than perfect)अशा मनोगंडासाठी शिवमुष्टिगंडु या शब्दाचे प्रयोजन असावे असे वाटते.



अनुक्रमणिका

**संदर्भ :**

१. श्रीज्ञानेश्वरी अध्याय ७, ओवी ७१७. तळटीप १.

२. शिवाजी नरहर भावे. श्रीज्ञानेश्वरी शब्दार्थकोश. पृ. ४२५

३. रा. ना. वेलिंगकर ज्ञानेश्वरीचें शब्दभांडार पृ. ५२१.

४. म्हाइंभट श्री गोविंदप्रभुचरित्र (सं) वि.भि. कोलते. लीळा २२०

□□□

**'ऐतिहासिक' १४ अनुपम वसाहत,**
**श्रेयनगर, औरंगाबाद ४३१००५.**

---

## 'बोल्होबा' : एक शक्यता

**पंडित आवळीकर**

तुकारामांचे वडील बोल्होबा. हे नाव कसे आले असावे आणि त्याचा अर्थ काय असावा यासंबंधी एक शक्यता मला सुचवायची आहे

'तुकोबा' हे नाव ज्या प्रकारचे आहे त्याच प्रकारचे 'बोल्होबा' हेही नाव आहे. तुकोबा हे 'तुकाई, या देवतानामावरून दिले गेले. ही 'तुकाई' कुठली लांबची देवता नव्हे. देहूपासून जवळच्या 'कोंढणपूर' येथील ही तुकाई. बोल्होबा या नावामागे 'बोल्हाई' ही देवता आहे. वाडे बोल्हाई या गावाच्या नावावरून या देवतेचा आणि तिच्या स्थानाचा बोध होतो. हे गावही देहूपासून दूर नाही.

देहू, कोंढणपूर आणि वाडे बोल्हाई ही तिन्ही गावे पुणे जिल्ह्यातील हवेली तालुक्यातील आहेत. एकमेकांच्या पंचक्रोशीतील आहेत. तेथील तुकाई आणि बोल्हाई यांच्या जत्रा प्रसिद्ध आणि पूर्वापार चालत आलेल्या आहेत. देहूमधील मोरे-आंबिले घराण्यात निदान, त्या जत्रांना जाण्याचा कुळाचार असावा. ही त्यांची नावे आपल्या मुलांना देण्यामागे नित्याचा हा कुळाचार किंवा नैमित्तिक नवस असण्याची शक्यता आहे.

□□□

**मराठी विभाग, गुलबर्गा विश्वविद्यालय,**
**गुलबर्गा ५८५१०६**

# 'साहित्य' या संज्ञेचा मूळ अर्थ

मो. गो. धडफळे

इंग्रजीत ज्याला 'लिटरेचर' चा म्हणतात त्यासाठी मराठीत 'साहित्य' हा 'तत्सम' शब्द वापरला जातो.'लिटरेचर' चा संबंध मुळात 'लेटर्स'म्हणजे'अक्षरे' (थोडक्यात 'शब्द') यांच्याशी असल्याने 'लिखित-साहित्य' किंवा 'लेखन' हे त्यात अभिप्रेत आहे. भारतीय साहित्याचा प्रारंभ वैदिक साहित्याने होतो. ''केवळ भारतीयच नव्हे तर युरो-भारतीय साहित्यात 'ऋग्वेद' हा सर्वप्रथम आहे,'' या विधानानेच डॉ. मॉरिझ विन्टरनिट्झ ऋग्वेदविषयक लेखनाला प्रारंभ करतात. वैदिकसाहित्य हे अनेक शतके केवळ मौखिक परंपरेतच जतन झाले होते; ते 'एपिगोनल' (मुखपरंपरागत) होते. अर्थज्ञान होण्यासाठी समोर लिहिलेली पोथी नसल्यामुळे 'स्वाध्याय' शब्दाचा अर्थ शिक्षकाने उच्चारल्यानंतर त्याचप्रमाणे शब्दोच्चार करून वेदसंहिता पाठ करणे एवढाच मर्यादित होता (आचार्योच्चारणानूच्चारणमात्रम् -श्रीभाष्य ब्रह्मसूत्र. १.१.१). या केवळ 'वाङ्मय' स्वरूपामुळेच शिकवणारा 'शिक्षक' ठरत होता. 'शिक्षा' म्हणजे सुयोग्य स्वरोच्चारण. यामुळेच पालितिपिटकांत, ब्राह्मणांच्या वेदविद्येची संभावना 'लपितलापन' म्हणजे पोपटपंची अशी झाली होती. (अम्बट्टसुत्त दीघनिकाय) ह्या पोपटपंचीमुळेच वेदसाहित्याची जपणूक झाली. इंग्रजीत ज्याला 'वेल्-रेड्' (बरेच वाचन केलेली व्यक्ती') म्हणतात त्याला 'बहुश्रुत' ('पुष्कळ ऐकलेली व्यक्ती') हा प्रतिशब्द याचमुळे वापरात आला.

मौखिक परंपरेमुळेच साहित्य हे 'वाङ्मय' ठरले. 'वाङ्मय' शब्दातील 'मयट्' ('मय') हा प्रत्यय प्राचुर्यार्थी (म्ह. 'शब्दप्रचुर') या अर्थाचा नसून 'शब्द' या कारणाचे कार्य (विकार)या अर्थाचा आहे. पिठापासून तयार झालेला पदार्थ जसा 'पिष्टमय' तसे वाणीपासून निपजलेले साहित्य 'वाङ्मय'ठरते. वाणीलाच 'सरस्वती' हा शब्द वैदिकसाहित्यात अनेकवार वापरला गेला आहे. (वाग् वै सरस्वती)या 'सरस्वती'चा प्रपंच म्हणजेच'सारस्वत' वा साहित्य. ग्रीक 'लोगॉस्' म्हणजे 'शब्द' व 'शब्दान्तर्भूत' 'अर्थ' किंवा 'ज्ञान' त्याचप्रमाणे 'सरस्वती' म्हणजेही 'वाग्' व 'वाग्योगविद्' किंवा 'ज्ञानी'. यामुळेच ज्ञानियांना 'नृसिंह-सरस्वती', 'मधुसूदन-सरस्वती' अशी बिरुदे प्राप्त झाली. 'सरस्वती' या शब्दाबरोबरच 'भारती' या भाषाविषयक पदाचाही समांतर आर्थिक प्रवास झाला आहे. 'प्रज्ञानंद-भारती' इत्यादी पदे याची निदर्शक आहेत.

**इळा-भारती-सरस्वती**

ऋग्वेदातील सर्व आप्रीसूक्तांमध्ये इळा, भारती व सरस्वती या तीन देवतांना

यजन केले आहे. 'ऐळ' (पहा 'पुरुरवा ऐड') 'भारत'व 'सारस्वत' ('नद्यांच्या काठी स्थिरावलेले'. जसे 'नहर'च्या काठावर राहणारे 'नेहरू') अशा आर्यांच्या जमाती होत्या. मूळ 'सरस्वती' म्हणजे 'हरव्वइती' haraxait म्हणे 'इराण' म्हणजे आर्यदेशांत होती. या आर्यांच्या वेगवेगळ्या टोळ्यांच्या भाषांना अनुक्रमे 'इडा', 'भारती' व 'सरस्वती' ही नावे असली पाहिजेत. त्यांचे 'सामान्यीकरण', होऊन हे तिन्ही शब्द नंतरकालीन संस्कृतात 'भाषा' वाचक ठरले. भारती म्हणजे भाषा. 'देव' नावाचीही आर्यांची मोठी टोळी होती. तिची भाषा 'देवभाषा'; म्हणूनच पुढे संस्कृतला 'देववाणी' म्हणू लागले. स्वर्गातल्या देवांशी या शब्दाचा काही संबंध नाही. 'संस्कृतवाणी देवें केली । तरी प्राकृत काय चोरापासून झाली ।' या एकनाथांच्या वचनाचा एक छान कोटी म्हणूनच आदर करावयास हवा; त्यांत ऐतिहासिक सत्य नाही. आजची वैदिक भाषा 'इळा', 'भारती', 'सरस्वती' आणि अशाच कदाचित इतरही काही आर्य-समाजसापेक्ष भाषांच्या संकरातून सामान्यीकरणाने निर्माण झालेली भाषा आहे.

वर सांगितल्याप्रमाणे 'लिटरेचर्' चा आशय 'अक्षरविन्यास' हा असल्याने खरेतर साहित्याचा निर्देश'लेखन' या शब्दानेच व्हावयाला हवा. कादंबरीलेखन, नाट्यलेखन असे शब्द वापरलेही जातात. पण साहित्यवाचक संज्ञा म्हणून लेखन ह्या शब्दाचा वापर फारसा आढळत नाही. 'आनंद'कार वा. गो. आपटे यांनी मात्र आपल्या सत्सहित्यग्रन्थमालेतल्या दुसऱ्या पुस्तकाचे नामकरण 'लेखनकला व लेखनव्यवसाय' (दुसरी आवृती. पुणे. १९२९) असे केले आहे.

वि. का. राजवाडे, वि.ल. भावे, य. र. आगाशे इत्यादींनी 'साहित्य' या शब्दाऐवजी 'सारस्वत' या शब्दाविषयी अधिक पसंती व्यक्त केली आहे. 'मनुष्यजीवनाचे वाङ्मयी कलेच्या आश्रयाने ज्यात मनोहर निदर्शन केलेले आहे असा ग्रन्थसमूह' म्हणजे सारस्वत अशी एक व्यावहारिक व्याख्याही य. र. आगाशे यांनी सादर केली आहे. या व्याख्येतील 'ग्रंथसमूह' हे पद 'साहित्य' या शब्दाचा मूळ अर्थ समजून घेताना फार महत्त्वाचे ठरणार आहे. कारण 'साहित्य' ही एक समूहवाचक संज्ञा आहे.

संस्कृतात साहित्याची चर्चा मुख्यत्वे 'अलंकारशास्त्र' वा 'काव्यशास्त्र' या विषयाच्या अनुषंगाने झाली आहे. विश्वनाथाने मात्र आपल्या काव्यशास्त्रावरील ग्रंथास 'साहित्यदर्पण' असे नाव दिले आहे. राजशेखरही 'साहित्यविद्ये' विषयी विवेचन करतो. 'काव्य' हा शब्द संस्कृतात केवळ 'poetry' या अर्थाने वापरला जात नाही.

नाट्य हे 'दृश्यकाव्य' मानले गेले आहे आणि सौन्दर्यशाली गद्य हे कवित्वाचा निकष मानण्यापर्यन्त काही समीक्षक जाऊन पोचले आहेत (गद्यं कवीनां निकषं वदन्ति) डॉ. विन्टरनिटझ् यांना हा साधा मुद्दा पाश्चात्त्यांना स्पष्ट करावासा वाटला आहे. "We must bear in mind that, from the Indian point of view, the metre is no criterion of poetry, as prose can just as well be poetry as can verses, so that it really does not make much difference, whether we read these passages as verses or rhythmical prose" (History of Indian Lit Vol. II p. 451) 'कवि' आणि 'काव्य' हे शब्द वेदांत परमदेवतांच्या 'निर्मातृ'त्त्वांचे आणि 'निर्मिती'चे वाचक आहेत (देवस्य परमं काव्यं न ममार न जीर्यति). ग्रीक poietes याचा अर्थ निर्माता (maker) हाच आहे. याचमुळे साहित्यकृतींना संस्कृतात 'कृति' किंवा 'क्रिया' हा शब्द वापरला जातो. (क्रियामिमां कालिदासस्य-मालविकाग्निमित्र) याचसाठी डॉ. राघवन म्हणतात त्याप्रमाणे कामसूत्रात वापरलेला 'क्रियाकल्प' हा शब्द काव्यशास्त्रवाचक ठरतो. कवी हे 'निर्मति' असल्यामुळेच रामदासांनी त्यांना 'शब्दसृष्टीचे ईश्वर' म्हणून गौरवले आहे. प्लेटो सर्वच कलांचे मूलभूत एकत्व मानतो आणि सर्व कलानिर्मात्यांना 'कवी' मानतो.
"The productions of all arts are kinds of poetry and their craftsmen are all poets (symposium 205 C.)

बऱ्याच आनुषंगिक अवांतर मुद्द्यांची मूळविषयापासून बरेच दूर जाऊन चर्चा केल्यावर 'साहित्य' या संज्ञेचा मूळ अर्थ या प्रमुख विषयाकडे वळू. या संदर्भात आजवर प्रामुख्याने तीन मते मांडण्यात आली आहेत.

१) साहित्य म्हणजे शब्द व अर्थ यांचा सहभाव. शब्दाचा अर्थाशी असणारा बारा प्रकारचा संबंध. "किं साहित्यम्? यः शब्दार्थयोः सम्बन्धः" (भोजकृत शृंगारप्रकाश २.२४). "(द्वादशधा) सम्बन्धः शब्दस्य अर्थस्य य : स साहित्यम् ।" (भावप्रकाश) ६. १४५.७)

शब्दार्थौ सहितावेव प्रतीतौ स्फुरतः सदा ।
सहिताविति तावेव किमपूर्वं विधीयते ॥

(वक्रोक्तिजीवित १.१६)

मम्मटादी काव्यसमीक्षकांच्या काव्याच्या व्याख्येत 'शब्दार्थौ' या द्वन्द्वाचाच वापर आढळतो. अर्थपूर्ण शब्दयोजनेत शब्दार्थांचे 'साहित्य' हे कोणासही अमान्य होणार नाही पण यामुळे 'साहित्य' ही समूहवाचक संज्ञा रूढ झाली असे मला वाटत नाही.

२) 'मराठीचे साहित्यशास्त्र' (ज्ञानेश्वर ते रामदास) व 'रामदास ते रामजोशी'




अनुक्रमणिका

या माहितीपूर्ण ग्रंथातून अनुक्रमे डॉ. मा. गो. देशमुख व त्यांच्या सुविद्य पत्नी डॉ. उषा मा. देशमुख यांनी साहित्य हा शब्द मराठी संतसाहित्यात 'सामग्री' या अर्थाने वापरला गेल्याचे अनेक दाखले दिले आहेत. भाषेला किंवा काव्याला सुशोभित करणारी साधनसामग्री म्हणून व रसाला पोषक असे साधन म्हणून नरेन्द्र आणि भास्कर यांनी साहित्य ही संज्ञा योजिली. आज मराठी भाषेत 'पूजेचे साहित्य', आणि पाककृती करताना आवश्यक असणारा 'मालमसाला' म्हणजे 'साहित्य' हे शब्दप्रयोग रूढ आहेतच.

३) 'लेखनकला व लेखन-व्यवसाय' या आपल्या पुस्तकात (पृ. ४-६) कै. वा. गो. आपटे यांनी जे हितकारक ते 'स-हित' असा एक नीतिपर अर्थ सादर करून चांगले संस्कार करणारे लेखन म्हणजे 'साहित्य' या अर्थाच्या संभावनेची चर्चा केली आहे. संस्कृत साहित्यसमीक्षेच्या परंपरेत 'उपदेश' या काव्यप्रयोजनाचा आग्रह अनेकांनी धरलेला दिसतो. बेन जॉन्सन, "It (poetry) nourishes and instructs our youth" असे म्हणून नीत्युपदेशाला महत्त्व देतो आणि जॉन ड्रायडनही उपदेशाला 'गौण' पण सहवर्ती प्रयोजन मानतो. "Delight is the chief not the only end of poetry, instruction can be admitted but in the second place, for poetry only instructs as it delights."

हे काव्यविषयक विचार संपूर्ण साहित्याबाबतही समजून घेता येतील. पण 'साहित्य' ही समूहवाचक संज्ञा या हितपरतेशी संबद्ध असेल असे मला वाटत नाही.

शब्द व अर्थ यांचे साहचर्य (साहित्य), सहितत्त्व म्हणजे समग्रत्व व म्हणून 'साहित्य' म्हणजे अलंकारादी वा रसपरिपोषक सामग्री, किंवा 'हितपरता' जपणारे लेखन म्हणजे साहित्य ह्या तिन्ही संभाव्यतांचा अव्हेर केल्यावर 'साहित्य' या पदाचा मूलार्थ कोणता स्वीकारायचा?

**'साहित्य' म्हणजे 'सांहित्य'**

'साहित्य' या शब्दाच्या भाषेतिहासासाठी प्राचीन भारतीय वैदिक साहित्याचे स्वरूप समजून घेणे आवश्यक आहे. ऋग्वेद ही ऋक्संहिता आहे; अथर्ववेद ही अथर्वसंहिता. हीच गोष्ट इतर दोन वेदांच्या संबंधात खरी आहे. महाभारत ही 'भारतसंहिता' आहे (चक्रे भारतसंहिताम् ।) रामायण ही अशीच 'संहिता' आहे. चरक-सुश्रुतांच्या 'संहिता' च आहेत. वराहमिहिराची बृहत्संहिता आहे. मनुस्मृति ही 'मनुसंहिता' आहे. वैदिक साहित्य कोणा एका ऋषीचे 'दर्शन' नाही. गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भृगु, वसिष्ठ या सर्वांची 'सूक्ते' ऋक्संहितेच्या मंडलात

'संहित' (एकत्रित) केली गेली आहेत. अनेक ऋचांचे एक सूक्त, अनेक सूक्तांचे एक मण्डल व अनेक मंडलांची संहिता. एकूण, सर्वच संग्रहांचे संग्रह.

डॉ. विन्टरनिट्झ सर्वच वैदिक साहित्याविषयी म्हणतात की हे लहान-लहान संग्रहांचे मोठे संग्रह व मोठमोठ्या संग्रहाचे त्याहून अधिक विशालकाय व विराटकाय संग्रह आहेत. चोवीस हजार श्लोकांचा 'जय'ग्रंथ वाढत वाढत साठ हजार श्लोकांचा 'भारतग्रंथ व पुढे एक लक्ष श्लोकात्मक 'महाभारत' कोश झाला. 'वाङ्मयीन महाराक्षस' "(Literary Monster) झाला.

जी कथा वैदिक साहित्याची तीच पुराणे व महाकाव्यांची आणि तीच जैन आगमांची व बौद्ध तिपिटकाची. विन्टरनिट्झ म्हणतात "Almost the whole of the oldest literature of the Buddhists consists of collections - collections of speeches or conversations, of sayings, songs, narratives and rules of the order. The Tipitaka is nothing but a great collection of such collections." (A Hist. of Ind. Lit. 1933 Vol. II p.p. 3-4.)

पाणिनीय परंपरेत विकसित झालेल्या व्याकरणातील वार्त्तिक प्रथेनुसार, 'हित' व 'तत' या क. भू. धा. वि. रूपांना 'सम्' हा उपसर्ग जोडला असता त्यातील अनुस्वाराचा लोप होतो. 'अपरस्पराः क्रियासातत्ये' या पाणिनीच्या (अष्टाध्यायी ४.१.१४४) सूत्रावरील काशिकावृत्तीत एका प्रसिद्ध श्लोकवार्त्तिकांत ही वस्तुस्थिती नोंदविण्यात आलेली आहे.

"लुम्पेदवश्यमः कृत्ये, तुं काममनसोरपि ।
समो वा हिततयोर्मांसस्य पचियुङ्घञोः ।।

'समो वा हिततयोः' याला अनुसरून संतत / सतत; संहित/सहित अशी वैकल्पिक रूपे मानली गेली आहेत. प्राचीन ऋषींच्या, कवींच्या व शास्त्रकारांच्या वचनांचे संहितीकरण करण्यात येऊन 'संहिता' तयार करण्यात आल्या. हेच प्राचीन 'सांहित्य' किंवा साहित्य याचमुळे पुढील काळातही ग्रंथसमूहांना 'साहित्य' ही संज्ञा प्राप्त झाली. 'साहित्य' या पदाला समानार्थ 'कोश' हे पदही वापरण्यात येत होते पण सापेक्षतया हे पद कमी प्रचलित होते. 'गाहासत्तसई' ची संहिता 'गाहाकोश' म्हणूनही ओळखली जात होती. याचप्रमाण 'नाटकरत्नकोश' 'कथाकोश' (विन्टरनिट्झ भाग २. पृ. ५४२) जिनेश्वराचा कथानककोश (खिस्तोत्तर १०९२) इत्यादी कोशांचा निर्देश करता येईल.

'साहित्य' हे मुळात 'सांहित्य' होते ही बाब समजून घेणे फार अगत्याचे आहे. यामुळे कित्येक शंकांचे निरसन होते. विशेषतः संस्कृतातील पूर्वापरतेचा

व्यवस्थित बोध होतो. वैदिक साहित्याचा परिचय करून देतांना ढोबळपणामुळे संहिता कालखंड, ब्राह्मण कालखंड, आरण्यक-कालखंड व उपनिषकालखंड असे जणू काही एकामागून एक अशा स्वरूपात घडलेल्या कालखंडांची कल्पना दृढमूल होते ती अयोग्य आहे. ऋग्वेद ही संहिता आहे. मूळ ऋचा या असंहित अवस्थेत होत्या. त्यांचे मंडलवार संहितीकरण नंतरचे आहे. तो ग्रंथ नाही. पहिले व दहावे मंडल हे सापेक्षतया नंतरचे, २ ते ७ ही गोत्रमंडले आधीची, गोत्रमंडलांत एका कुळाची (उदा. वसिष्ठांचे सातवे मण्डल, विश्वामित्रांचे तिसरे मण्डल) समग्र कविता संकलित करण्यात आली आहे. नवव्या मंडलात अनेक कुळांतील ऋषींची सोमविषयक सूक्ते एकत्र करण्यात आली आहेत. ऋग्वेदातील काही ऋचाच पुन्हा अथर्ववेदात 'ब्रह्म' वा 'मंत्र' म्हणून संगृहीत झाल्या आहेत. तर यजुर्वेदात यजुर्मन्य म्हणून दाखल झाल्या आहेत अथर्ववेद हा साक्षतयाच पदाच्या नंतर आहे. अथर्ववेदातील 'नंतरची' सूक्ते ऋग्वेदातील 'नंतरच्या' सूक्तांहून नंतरची आहेत एवढाच त्याचा अर्थ आहे. अथर्व वेदातील काही 'आधीची' ऋग्वे सूक्ते ही ऋग्वेदातील काही 'नंतरच्या सूक्तांच्या आधीची संभवतात, या गोष्टी या वाङ्मयाचे 'संहितात्व' उमगले तरच कळू शकतील

संहिता, ब्राह्मण, आरण्यके व उपनिषदे हे वाङ्मयप्रकार (literary patterns)आहेत. ऋक्संहितेतील व अथर्ववेदातील ''द्वा सुपर्णा'' यांसारखे भाग मुण्डक, कठ, श्वेताश्वतर यांत संगृहीत झाले आहेत. ईशावास्योपनिषद् हे उपनिषद म्हणून स्वतंत्र मानले गेले असले तरी ते पूर्णपणे यजुर्वेदाच्या वाजसनेयी शाखेचा चाळिसावा अध्याय आहे. 'ईशावास्यमिदं सर्वम्...' या मंत्राचा संदर्भ म्हणूनच 'ईशावास्योपनिषद' असा व 'शुक्लयजुर्वेद ४०.१' असा द्विप्रकारक संभवतो. जैमिनीय हे उपनिषद् ब्राह्मण आहे तर 'बृहद-आरण्यक-उपनिषद्' आहे. म्हणूनच संहितोपनिषद्, ब्राह्मणोपनिषद् व आरण्यकोपनिषद् असे तीन प्रकार संभवतात. शंकराचार्य बृहदारण्यकोपनिषदाचा संदर्भ अनेकवार 'शातपथीय ब्राह्मण' असा करतात कारण सरतेशेवटी शाखास्वरूपी वैदिक परम्परा या सलग संहिता आहेत. वेगवेगळे ग्रंथ नव्हेत.

रामायण आधीचे की महाभारत असाही एक अज्ञानमूलक प्रश्न विचारला जातो. सर्वसाधारणपणाने महाभारत हे इ. स. पू. ४०० ते इसवी सन ४०० म्हणजे एकूण आठशे वर्षांच्या कालखंडात रचले गेले आहे तर रामायण साधारणपणे इ. स. पू २०० ते इसवीसन २०० अशा चारशे वर्षांच्या कालखंडात रचले गेले. रामायण नंतर सुरू होऊन आधी पूर्ण झाले तर महाभारत हे आधी सुरू होऊन

नंतर पूर्ण झाले. मन्वादिक स्मृतीही निखळ एककर्तृक नाहीत. डॉ. यार्दीसारखे पंडित संख्याशास्त्राच्या आधाराने 'यत्र नार्यस्तु पूज्यन्ते' हा श्लोक व 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' हा श्लोक यात काळाचे किती अंतर आहे हे दाखवून देऊ शकतात. एकूणच प्राचीन भारतीय साहित्याचे संहितत्व सर्वार्थाने समजून घेणे इतिहासाच्या सुयोग्य आकलनासाठी अतिशय आवश्यक आहे.

□□□

**यशोदीप 'ब' सदनिका क्र.२ रामबाग कॉलनी,**
**सदाशिव पेठ, पुणे- ४११०३०. दूरध्वनी: ५३२०८१**

---

घाई घाई घाई .......

खोताच्या वाडीत एक खानावळ आहे ''अनंताश्रम''. तिथे मालकांनी लिहून ठेवलंय- ''घाईलाही वेळ लागतो.'' पण मराठी माणसाला कुठे धीर? नेहमी गडबडीत असतो. त्याची ही लगबग त्याच्या भाषेत प्रतिबिंबित होताना दिसते. माझी मैत्रीण आपली दिनचर्या सांगताना म्हणायची- ''अग, सकाळी उठले आणि भराभरा कामाला लागले. ८ वाजता बाई आली. पटकन् उठून दार उघडलं. तिला म्हटलं, ''भर्रकन् भांडी घासून घे पाहू.'' मी हातासरशी पीठ मळून घेतलं. झरझर पोळ्या लाटून टाकल्या. मग मुलांना उठवलं. म्हटलं पटापटा आवरून घ्या चला. तुम्हाला बसपाशी पोचवून येते.'' अग, ही मुलं रेंगाळतच होती . त्यांना म्हटलं, चला उचला पावलं चटचट, नाहीतर बस निघून जायची.'' अशा घाईगर्दीत तिचा दिवस भुर्रकन उडून जायचा.

मराठी माणसाला रागही चटकन् येतो, तो तो भडाभडा बोलूनही दाखवतो आणि तडकाफडकी नातं तोडून मोकळा होतो. किती ही घाई सर्व गोष्टींची. पटपट, पटापटा, भरभर, भराभरा, चटचट, चटाचटा, पटकन, चटकन्, भर्रकन्, खर्रकन्, मटकन्, खाडकन्, तडातड, भाडभाड, धाडधाड, ताडताड असे कितीतरी शब्द मराठी माणसाच्या आयुष्यातील गतिमानता दाखवतात. ही गतिमानता मराठी भाषेच्या भरभर होणाऱ्या प्रगतीच्या रूपात दिसली तर किती बहार होईल!

□□□

**प्रेषक**
**पुष्पा पई,**
**भाषा शिक्षण विभाग,**
**एस्. एन्. डी. टी. महिला विद्यापीठ,मुंबई.**

---

# यशवंतांच्या 'आई' कवितेतील परिष्करण

नीलिमा गुंडी

९ मार्च १९९९ रोजी कवी यशवंतांची जन्मशताब्दी साजरी होत आहे. त्या निमित्ताने त्यांच्या कवितांचा बारकाईने अभ्यास केला. तेव्हा त्यांच्या कवितेतील परिष्करण लक्षात आले.

पुण्याच्या 'रविकिरणमंडळा'चे सदस्य असलेले कवी यशवंत हे भावकवी म्हणून लोकप्रिय होते. त्यांनी आपल्या कवितांतून भोवतालचे दैनंदिन जीवन (त्यातील तपशिलांसकट) भावपूर्णतेचे अस्तर लावून व्यक्त केले. दैनंदिन जीवन हे खरं तर 'गद्यग्रथित' असते. असे जीवन कल्पनेचा साजही न देता काव्यात्म करण्याचे अवघड काम त्यांनी आपल्या काही कवितांमध्ये यशस्वी करून दाखविले आहे. उदा. 'प्रतीक्षा' 'तूच रमणी' या कविता. त्यांची सुरूवातीची 'आई' ही कविता याच प्रकारची, पण त्यात एक कडवे मात्र आलंकारिक कल्पनांनी भरलेले आहे.

''आई म्हणोनि कोणी । आईस हाक मारी
ती हाक येई कानी । मज होय शोककारी''

अशी सुरूवात असलेली यशवंतांची ''आई'' ही कविता दि. २२.१.१९२२ रोजी लिहिलेली आहे. ७ कडव्यांची ही कविता सर्वप्रथम ''वीणाझंकार'' (१९२२) मध्ये (पृ. १०-१२) प्रसिद्ध झालेली आहे. त्यानंतर ''यशोधन'' मध्ये ही ती समाविष्ट आहे. (पृ. ४१-४२)

''वीणाझंकार'' व ''यशोधन'' मधील कविता ताडून पहाता कवीने या कवितेत परिष्करण केल्याचे लक्षात येते.

संपूर्ण कवितेत पाचव्या कडव्यात सर्वाधिक म्हणजे काही चरण बदललेले असून इतर कडव्यांमध्ये तीन शब्द बदलले आहेत.

बदल याप्रमाणे :-

१) ''वीणाझंकार'' - ओळ क्र. २, कडवे क्र. १
''ती हाक येई कानीं । मज होई शोकाकारी''
''यशोधन'' - ती हाक येई कानीं, मज होय शोककारी''

२) ''वीणाझंकार'' - ओळ क्र. ४, कडवे क्र. २
''पाहून अंतरात्मा । व्याकूळ हाय! होई,''
''यशोधन'' - ''पाहून अंतरात्मा व्याकूळ मात्र होई''

३) ''वीणाझंकार'' - ओळ क्र. २ , कडवे क्र. ४

''त्या अज्ञ बालिकेला । समजे न यांत कांहीं,''

''यशोधन'' - 'त्या सान बालिकेला समजे न यांत कांहीं''

४) ''वीणाझंकार'' - कडवे क्र . ५

''आई! तुझ्याच ठायीं । सामर्थ्य नंदिनीचें,

**सत्तेज पौर्णिमेच्या । त्या शांत चंद्रिकेचें,**
**औदार्य या नभाचें । ते हास्य दिग्वधूंचें**
**गांभीर्य सागराचे । पावित्र्य देवतांचें,**
**अद्वैत तापसांचें । निरपेक्ष प्रेम भूचें**
वास्तव्य या गुणांचे । आई! तुझ्यांत सांचे.''

''यशोधन''

''आई! तुझ्याच ठायीं सामर्थ्य नंदिनीचें

**माहेर मंगलाचें अद्वैत तापसांचे**
**गांभीर्य सागराचें औदार्य या धरेचें**
**नेत्रांत तेज नाचे त्या शांत चंद्रिकेचें**
**वात्सल्य गाढ पोटीं त्या मेघमंडळीचें**
**वास्तव्य या गुणांचे आई, तुझ्यात साचें''**

आता या परिष्करणामागचे कलात्मक प्रयोजन शोधूया. पहिल्या कडव्यातील 'होई' ऐवजीचे 'होय' हे शब्दरूप अचूक आहे. दुसऱ्या कडव्यात चिमणी आणि तिची पिले, गाय-वासरू यांचे वात्सल्य पाहताना कवीला वाटणारे दुःख वर्णन केले आहे. ते पाहताना जाणवणारी व्याकुळता 'हाय!' या शब्दांतून व्यक्त होत असली तरी त्यातील सूर अतिभावुक होता. त्यामुळे 'व्याकूळ मात्र होई' हा बदल, विरोधाने कवीची मनःस्थिती सुचविणारा योग्य असाच आहे. चौथ्या कडव्यात आईच्या मृत्यूचा छोट्या बहिणीवर/ ताईवर परिणाम झाला नाही, याचा उल्लेख आहे. तिचे बालवय सांगताना प्रथम वापरलेले 'अज्ञ' हे विशेषण नंतर बदलले आहे व 'सान' हे विशेषण वापरले आहे. हा बदलही कवितेतील सहजपणाला शोभेसा आहे.

सर्वाधिक बदल पाचव्या कडव्यात आहेत. संपूर्ण कवितेत जो आत्मलेखनाचा सूर आहे तो या कडव्यात नाही. येथे कल्पनांचा साज चढविलेला आहे. त्यामुळे हे कडवे आपल्याला वाचताना खटकते परंतु मूळ कडवे पाहिल्यावर खुद्द कवीलाही हे कडवे खटकले असल्याचे लक्षात येते म्हणून तर त्यात सर्वाधिक फेरफार आहेत! मूळच्या कडव्यातील अलंकरणापेक्षा सुधारित कडव्यातील अलंकरण सोपेपणाकडे झुकणारे आहे.





अनुक्रमणिका

'सत्तेज पौर्णिमेच्या' हे चंद्रिकेचे वर्णन करणारे क्लिष्ट जोडाक्षरयुक्त शब्द गाळून टाकले आहेत. 'औदार्य या नभाचे' ही कल्पना बदलली आहे. त्याऐवजी जवळची - पार्थिव अशी धरा औदार्यासाठी प्रमाण मानली आहे. त्यामुळे 'निरपेक्ष प्रेम भूचे' याची गरज उरली नाही.

'ते हास्य दिग्वधूंचे' ही कल्पना या करुणरसपूर्ण कवितेला विशोभी अशी होती.ती गाळली आहे. 'पावित्र्य देवतांचे' ही 'स्वर्गीयते'ची सूचक दूरच्या भासविश्वातील कल्पना गाळली आहे . कवितेतील पार्थिव अनुभवाशी ते सुसंगत आहे. गाळलेल्या कल्पनांच्या जागी आलेल्या नव्या कल्पना अशा आहेत. १. 'माहेर मंगलाचे' - स्त्री आणि माहेर यांच्यात जो भावसंबंध असतो तो लक्षात घेता 'माहेर मंगलाचे' ही कल्पना साधी व संयुक्तिक ठरते. २. सुधारित कडव्यात चंद्रिकेला विशेषणे न वापरता 'आई'ला अधिक महत्त्व दिले आाहे. 'नेत्रात तेज नाचे त्या शांत चंद्रिकेचे' हा बदल त्यामुळे कलापूर्ण वाटतो. शेवटी आलेली नवी कल्पना 'वात्सल्य गाढ पोटी त्या मेघमंडळाचे'. मूळचे 'नभाचे औदार्य' गाळून त्याऐवजी येथे मेघमंडळाचे चित्रण येते. या कवितेतील वात्सल्यरसाच्या प्रवाहाशी ही प्रतिम सहज एकरूप होते तसेच प्रत्येक अर्ध्या चरणानंतरचा दंड काढून टाकल्यामुळेही कवितेचा ओघ कायम राहायला मदत झाली आहे.

यशवंतांची 'यशोधन' मधील कविताच सर्वपरिचित आहे. 'श्यामची आई' चित्रपटातही तिला स्थान मिळालेले आहे. त्यामुळे या कवितेने मराठी मनावर काही काळ अधिराज्य गाजविले आहे. रविकिरण मंडळातील कवी माधव जूलियन आपल्या कवितांची परिष्करणे करीत; हे सर्वश्रुत आहे. त्यांच्या परिष्करणांचा अभ्यासही झालेला आहे. कवी यशवंत परिष्करणे करीत, याची फारशी माहिती दिसत नाही. परिष्करण करण्यातून कवीचे 'समीक्षक मन' एकप्रकारे व्यक्त होत असतते. निर्मितिप्रक्रियेसंदर्भात परिष्करण प्रवृत्तीचा खोलवर विचार करता येईल. अर्थात काही मर्यादेपर्यंत कवीने परिष्करण करणे साहजिक असते. त्यादृष्टीने 'आई' या महत्त्वाच्या कवितेतील परिष्करणावर येथे प्रकाश टाकला आहे.

संदर्भ:

१) ''वीणाझंकार'', यशवंत-गिरीश, वीणामंडळ, पुणे, १९२२

२) ''यशोधन'' प्रकाशक यशवंत, पुणे (प्रथम आवृत्ती १९२९), आ. ३, १९३३

□□□

**३, अन्नपूर्णा, १२५९ शुक्रवार पेठ,**
**सुभाषनगर, पाचवी गल्ली, पुणे- ४११००२.**

# पाण्यामध्ये मासा झोप घेई कैसा?

**कल्याण काळे**

मराठी भाषा सोपी की कठीण? अर्थात आपल्याला ती सोपीच वाटणार. कोणत्याही मातृभाषाभाषकाला आपली मातृभाषा सोपीच वाटते. मातृभाषेच्या तुलनेने इतर भाषा अवघड अथवा कठीण वाटणार हे साहजिकच आहे. पण इतर भाषांमध्येही हिंदी, गुजराती यांसारख्या भाषा सोप्या वाटतात, तर त्या मानाने कन्नड, तेलुगू, तमिळ या भाषा कठीण वाटतात, याचं कारण, हिंदी, गुजराती या भाषा आपल्याला जेवढ्या ऐकायला मिळतात तेवढ्या कन्नड, तेलगू, तमिळ या भाषा मिळत नाहीत. त्यांच्याशी आपला फार कमी संपर्क येतो. दुसरं कारण म्हणजे एकाच आर्यभारतीय वंशातील भाषा असल्यानं गुजराती, हिंदी या भाषा व्याकरण, शब्दसंग्रह या बाबतीत मराठीला जवळच्या आहेत. त्या मानाने दाक्षिणात्य भाषा भिन्नवंशीय असल्यानं दूरच्या आहेत. पण त्या भाषा निदान भारतीय तरी आहेत. स्वाहिली, जपानीसारख्या भाषा भिन्नवंशीय आणि परकीय असल्यानं त्या आणखीच दूरच्या आणि कठीण वाटतात. तेव्हा कठीणपणा अथवा सोपेपणा हा भाषांचा अंगभूत गुण नसून तो भाषेच्या कमी-अधिक परिचयावर अवलंबून आहे. भाषेचा कठीणपणा ही सापेक्ष गोष्ट आहे. त्यामुळे जे एकाला कठीण वाटतं ते दुसऱ्याला सोपं वाटणार हे ओघानंच आलं.

आपण शाळा-कॉलेजातून इंग्रजी शिकण्यासाठी दहा-पंधरा वर्षं घालवतो, तरी आपल्याला चांगलं इंग्रजी येत नाही. ती भाषा आपल्याला कठीण वाटते व त्याबद्दल आपल्याला खंतही वाटत असते. अशी खंत बाळगणाऱ्या एका गृहस्थांना एकदा इंग्लंडला जायचा योग आला. तिथं गेल्यानंतर तिथली सगळीच माणसं इंग्रजी अगदी सफाईदार बोलतात हे पाहून ते आश्चर्यचकित झाले. त्यांनी बायकोला पत्रानं ही गोष्ट कळवली. 'काय सांगू तुला इथलं आश्चर्य! इथली चार-पाच वर्षांची मुलंसुद्धा चांगलं फाडफाड इंग्रजी बोलत असतात.'' खरं म्हणजे यात आश्चर्य वाटण्यासारखं काय आहे? आपली मुलं नाही का फाडफाड मराठी बोलत? माशाला पाण्यात पोहताना कष्ट पडतात का? तुकारामांनी म्हटलंच आहे ना, ''पाण्यामध्ये मासा । झोप घेई कैसा । जावें त्याच्या वंशा । तेव्हा कळे॥'' तेव्हा त्या त्या भाषेच्या भाषकाला ती ती भाषा सोपी वाटणारच. आपल्याला मराठी सोपी वाटते तशी ती अमराठी माणसाला वाटणारच नाही. त्याच्या नजरेतून पाहिलं तर आपली ही सोपी भाषा पर्वतप्राय अडथळ्यांनी भरली आहे, असं

लक्षात येईल. भाषेकडे त्रयस्थपणानं पाहात नसल्यामुळे आपणही कितीतरी भ्रामक कल्पना बाळगून असतो.

संस्कृत भाषा तिच्यातील जोडाक्षरांमुळे आपल्याला फार कठीण वाटते. त्या मानानं आपली मराठी किती सुटसुटीत, कमी जोडाक्षरांची असं आपल्याला वाटत असतं. पण मराठीत देखील संस्कृतपेक्षा किती तरी विचित्र जोडाक्षरं आहेत याची आपल्याला कुठे कल्पना आहे? पुढील उदाहरणंच याची साक्ष पटवतील. पडला (ड्ला), बसला (स्ला), पळतो (ळ्तो), मागचा (ग्चा),पुढचा (ढ्चा), तुमचा (म्चा), कळलं (ळ्लं), बाबतीत (ब्ती), इत्यादी. मराठीतील काही ध्वनी किती कठीण आहेत, हे महाराष्ट्रात पिढ्यानपिढ्या राहणाऱ्या परप्रांतीय लोकांच्या उच्चारांवरूनही कळून येतं. चमचा, लोणचं, चोर इ. शब्दातील दन्त्य 'च' चा उच्चार उत्तरेकडील लोकांना फार कठीण वाटतो. डोकं, खोकं, संत्रं इ. शब्दांतील अन्त्य 'अ'च्या उच्चाराशीही जमवून घ्यायला उत्तरेकडील लोकांना अवघड जातं. पाश्चात्त्यांना आपले मूर्धन्य उच्चार म्हणजे ट, ठ, ड, ढ, ण आणि 'ळ' हे अवघड वाटतात.

मराठीच्या उच्चारणाशी कशीबशी दोस्ती केली तरी मराठी व्याकरणात काय कमी अडचणी आहेत? मराठीत प्रत्येक नामाला लिंग असतं; आणि ते त्याच्याशी संबंधित असलेल्या विशेषणांवर आणि क्रियापदरूपांवर प्रभाव गाजवतं. त्यामुळे त्या नामाचं लिंग माहीत असल्याशिवाय मराठी वाक्यरचनाच करता येणार नाही. पण प्रत्येक नामाचं लिंग ओळखायला मराठीत कोणतीच खूण नाही. फक्त कुत्रं, जातं सारखी 'अ' कारान्त नामं नपुंसकलिंगी असतात एवढाच एक नियम आपण सांगू शकतो. बाकी सगळा आनंदच आहे. मराठी संस्कृतशी संबंधित भाषा आहे म्हणून तिची लिंग संस्कृतशी जुळणारी असतील असं म्हणावं तर मित्र, विघ्न, प्रेत, आधी, व्याधी, व्यक्ती, स्वप्न इ. अपवादभूत शब्दांची फौजच्या फौज पुढे उभी राहाते. नरवाचक शब्द पुल्लिंगी. मादीवाचक शब्द स्त्रीलिंगी असा नियम करायला जावं तर डास, ढेकूण, मुंगी, चिलट, झुरळ इ. कीटकसृष्टीत पाळला जात नाही असं दिसतंय. मनुष्याच्या सृष्टीतसुद्धा, "आज स्वारी (नवरा) लवकर घरी आली", "आमचं कुटुंब (बायको)" असे शब्दप्रयोग कानांवर पडतात. याहीपेक्षा निर्जीव वस्तूंच्या लिंगांच्या बाबतीत जास्त अडचणी आहेत. खुर्ची, टेबल, सोफा या फर्निचरच्या वस्तू पण त्यांच्या लिंगांच्या बाबतीत कुठं ताळमेळ आहे? एकच ताक पण मठ्ठा रूपात पुढे आलं की पुल्लिंगी बनतं आणि त्याची

कढी केली की स्त्रीलिंगी बनते. कॉफी, चहा, दूध तिन्ही पेयंच पण प्रत्येकाचं लिंग वेगळं. एक लाकडाचा तुकडा भिंतीत ठोकला की खुंटी बनतो आणि जमिनीत रोवला की खुंटा बनतो. पुरुषासारखा पुरुष पण त्याची मिशी मात्र स्त्रीलिंगी आणि स्त्रीचा अंबाडा मात्र पुल्लिंगी असे अनेक अडचणीत टाकणारे प्रकार मराठीत आहेत. या लिंगव्यवस्थेशी गाठ पडताच शिकणाऱ्याचा उत्साह सुरुवातीलाच पार मावळतो. त्यानंतर सामान्यरूपं, वचनव्यवस्था, सर्वनामं, भूतकाळाची अनियमित रूपं, भविष्यकाळाची भिन्न भिन्न रूपं आणि सर्वांत शेवटी वाक्यरचना, या सर्व बाबतीत परकीय माणसाला फार झगडावं लागतं. वरील प्रकारात नियम असलेच तर ते फार सूक्ष्म व किचकट आहेत आणि बऱ्याच बाबतीत नियमांचा अभावच आहे. मराठीभाषक अशा अराजकात कसं निभावून घेतो याचंच परभाषकांना आश्चर्य वाटत असतं. पण आपण मात्र पाण्यात झोप घेणाऱ्या माशाप्रमाणे निर्धास्त आहोत, हे खरंय की नाही?

□□□

**दीपक, तुळशीबागवाले कॉलनी**
**सहकार नगर, क्र. २, पुणे ४११००९**

---

## सदस्यवार्ता

मराठी अभ्यास परिषदेच्या एक संस्थापक सदस्य आशा मुंडले यांनी १९६२-६३ मध्ये केलेल्या ''कालटुमांडी'' (निहाली किंवा नहाली भाषेचे खरे नाव) वरील मूलभूत संशोधनाचा गोषवारा 'इंटरनॅशनल जर्नल ऑफ एक्झॉटिक लँग्वेजेस' च्या डिसेंबर ९६ च्या अंकात प्रसिद्ध झाला असून तो सर्व अंकच निहाली भाषेला समर्पित आहे.

ही भाषा महाराष्ट्र व मध्यप्रदेश यांच्या सीमेवर बोलली जात असून हे लोक स्वत:ला रावणाचे वंशज समजतात. याच विषयावर अगदी सोप्या भाषेत 'निहाली माााणसं' हे पुस्तक ह्याच लेखिकेने पुण्याच्या समाजशिक्षण मालेत प्रसिद्ध केले आहे.

मूलभूत ज्ञान सोप्या मराठीत सामान्य वाचकांपर्यंत पोचवण्याचा हा प्रयत्न अभिनंदनीय आहे.

(निहाली माणसं, आशा मुंडले, समाजशिक्षणमाला ५३८, पृष्ठे ३२, मूल्य रु. ३)

□□□

# डॉ. सुमित्र मंगेश कत्रे
## डेक्कन कॉलेज रीसर्च इन्स्टिट्यूटचे यशस्वी संचालक

**म.अ. मेहेंदळे**

डॉ. कत्रे यांचे नुकतेच २१ ऑक्टोबर १९९८ रोजी पहाटे चारच्या सुमारास निधन झाले. ते ९२ वर्षांचे होते (जन्मः ११ एप्रिल १९०६). मृत्युसमयी ते अमेरिकेस त्यांच्या मोठ्या मुलीकडे- सौ. पद्मा सवूर यांच्याकडे- होते. डॉ. कत्रे यांची शैक्षणिक, प्रशासकीय कारकीर्द अत्यंत यशस्वी झाली. त्यांच्या निधनाने संस्कृत व्याकरणाच्या एका उत्तम जाणकाराला, भाषाशास्त्रज्ञाला, संशोधनाच्या विविध वाटा हेरून त्यावरून विद्यार्थ्यांना नेणाऱ्या मार्गदर्शकाला आपण मुकलो आहोत.

डॉ. कत्रे यांचा आणि माझा संबंध गेल्या सुमारे साठ वर्षांचा आहे. माझे संशोधकीय जीवन घडविण्यास त्यांनी मला बहुमोल साह्य केले. त्यांचा आणि माझा संबंध केवळ गुरु -शिष्य, संस्थे तील संचालक -सेवक एवढ्यापुरताच मर्यादित नव्हता. माझ्या वैयक्तिक जीवनाशी, माझ्या कुटुंबाशीही त्यांच्या कुटुंबाचा जवळचा संबंध होता. डेक्कन कॉलेजच्या आवारात ते आणि आम्ही वीस वर्षे जवळजवळ राहत होतो. त्यांच्या निधनाची बातमी ऐकल्यावर मला अतिशय दुःख झाले, आणि त्याबरोबरच गेल्या कित्येक वर्षांतल्या अनेक आठवणींनी मनात गर्दी केली.

डॉ.कत्रे यांच्याशी माझी पहिली भेट १९३८ साली मी मुंबईत एम. ए. चा विद्यार्थी असताना झाली. त्यावेळी मुंबई विद्यापीठाने एम. ए. पदवीसाठी अर्धमागधी पाठ्यपुस्तकात पुष्पदंताच्या 'जसहर चरिउ' ह्या अपभ्रंश ग्रंथाचा अंतर्भाव केला होता. अपभ्रंश भाषेची जाण असणाऱ्या प्राध्यापकाच्या मदतीशिवाय हे पुस्तक वाचणे विद्यार्थ्यांना अवघड होते. आमच्या सुदैवाने डॉ. कत्रे यांची तेव्हा रामनारायण रूईया कॉलेजात बदली झाल्यामुळे ते पुण्याहून मुंबईत आले होते. एम.ए.च्या विद्यार्थ्यांना त्यांनी 'जसहरचरिउ' शिकवावे म्हणून मी त्यांना विनंती करण्यास त्यांच्याकडे गेलो. वास्तविक अशी विनंती त्यांना मुंबई विद्यापीठाच्या तेव्हाच्या संस्कृत अध्यापन प्रमुखाकडून जायला हवी होती. परंतु डॉ. कत्रे यांनी विद्यार्थ्यांची अडचण ओळखून, हा एक प्रतिष्ठेचा प्रश्न न मानता, माझ्यासारख्या विद्यार्थ्यांच्या विनंतीला मान्यता दिली आणि आमचे एम. ए.चे वर्ग सुरू झाले. त्यांच्याशी त्या निमित्ताने माझा जो संबंध आला तो पुढे वृद्धिंगत होऊन माझ्या शैक्षणिक जीवनाचे ते कर्णधार बनणार आहेत, अशी मला पुसटशीही कल्पना तेव्हा नव्हती.

१९३९साली मी एम.ए. झालो. त्याच वर्षी ऑगस्ट महिन्यात पुण्यात

एके काळी पदवीपूर्व अभ्यासक्रम शिकवणाऱ्या डेक्कन कॉलेजचे रूपांतर पदव्युत्तर आणि संशोधन संस्थेत झाले आणि Deccan College Post -Graduate and Research institute ह्या नव्या नावाने ती अस्तित्वात झाली. ऑगस्ट सतरा सारखेस नव्या संस्थेत प्राध्यापकांनी आपापली पदे स्वीकारली आणि आम्ही संस्थेचे विद्यार्थी १ सप्टेंबरला दाखल झालो. तेव्हाच्या पहिल्या सात प्राध्यापक- प्रपाठकांत डॉ. कत्रे इंडोयुरोपिअन फिलॉलॉजी या विषयाचे प्राध्यापक म्हणून रूजू झाले. पहिल्या सात विद्यार्थ्यांत मी एक होतो. डॉ. कत्रे यांच्या मार्गदर्शना खाली.Historical Grammar of Inscriptional Prakrit ह्या विषयावर मी प्रबंध लिहिण्याचे काम सुरू केले.

डॉ. कत्रे यांचे प्राथमिक- माध्यमिक शिक्षण मंगलोरला, आणि कॉलेज शिक्षण मद्रासला झाले. शाळेत शिकत असतानाच त्यांनी पाणिनीच्या अष्टाध्यायीचे अध्ययन शास्त्रीबुवांकडे पारंपरिक पद्धतीने केले. पुढे कॉलेजात बी. ए. पदवीसाठी त्यांनी गणित विषय निवडला. ती पदवी मिळाल्यावर त्याच विषयात उच्च अध्ययन करून केंब्रिज विद्यापीठाची गणित विषयातील पदवी संपादण्याचा त्यांचा मनोदय होता. परंतु केंब्रिज विद्यापीठात प्रवेश मिळवण्यासाठी आवश्यक ती हिंदुस्थानातून पाठविलेली कागदपत्रे दैवगतीने त्यांना वेळेवर मिळाली नाहीत आणि त्यामुळे त्यांना प्रवेश घेता आला नाही. अशा परिस्थितीत केंब्रिजमधे आणखी एक वर्ष नुसते घालवण्याऐवजी ते लंडनच्या स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीजमधे गेले आणि त्यांनी प्रा.राल्फ टर्नर यांची भेट घेतली. डॉ. कत्र्यांनी पूर्वी केलेल्या संस्कृतच्या अभ्यासाच्या जोरावर त्यांनी त्या संस्थेत प्रवेश मिळवला आणि प्रथम तिथल्या आवश्यक त्या परीक्षा देऊन डॉ. विल्यम स्टेड यांच्या मार्गदर्शनाखाली पीएच्. डी. पदवीसाठी अभ्यास सुरू केला. संस्कृतबरोबरच डॉ. कत्र्यांनी पाली-प्राकृत आणि जर्मन-फ्रेंच या भाषांचाही अभ्यास केला. त्याच बरोबर प्रा. टर्नर यांच्या इंडो-युरोपिअन सेमिनार्सनाही ते हजर असत. त्यांचा पी एच.डीच्या प्रबंधाचा विषय Early Buddhlist Ballads and Their Relation to the Older Upnishadas असा होता. १९३१ साली लंडन विद्यापीठाची पी एच. डी. पदवी मिळवून ते भारतात परत आले.

डॉ. कत्रे भारतात परतले तेव्हा प्राचीन भारतीय भाषांचा भाषाशास्त्रदृष्ट्या अभ्यास हा त्यांचा शैक्षणिक विशेष होता. पण त्या काळात मुंबई प्रांतात भाषाशास्त्राचे अध्यापन, संशोधन करण्याची सोय कुठेही नव्हती. तेव्हा पहिली काही वर्षे त्यांनी पुण्याच्या नवरोसजी वाडिया कॉलेज आणि सर परशुरामभाऊ कॉलेज ह्या मुंबई विद्यापीठाशी संलग्न असलेल्या दोन महाविद्यालयांत संस्कृत व प्राकृत भाषा शिकविण्याचे

काम केले. पुढे १९३९ साली पुण्यात डेक्कन कॉलेज रीसर्च इन्स्टिट्यूट ह्या संस्थेची स्थापना झाली आणि त्यांत Professor of Indo- European Philology हे एक पद निश्चित केले गेले. डॉ. कत्रे यांच्या आयुष्यात ही एक अत्यंत महत्त्वाची घटना म्हणायला हवी. डेक्कन कॉलेजात त्यांची नेमणूक ह्या पदावर झाली आणि त्यांच्या साऱ्या आयुष्यास कलाटणी मिळाली. डॉ. कत्रे यांच्या कल्पकतेस, संयोजनकौशल्यास, संशोधनाची नवनवीन क्षेत्रे हेरण्यास त्यांना डेक्कन कॉलेजात भरपूर वाव मिळाला. पुण्याला प्रारंभी महाविद्यालयातून डॉ. कत्रे शिकवत होते. तेव्हा त्यांचा प्रा. पी. के. गोडे आणि डॉ. व्ही. एम. सुकठणकर यांच्याशीही संबंध आला. हा संबंध डॉ. कत्रे यांच्या पुढील कार्याच्या दृष्टीने फार मोलाचा ठरला. प्रा. गोडे यांच्या सहकार्याने त्यांनी 'न्यू इंडियन अँटिक्वेरी' आणि 'ओरिएंटल लिटररी डायजेस्ट' ह्या दोन नियतकालिकांचे संपादन सुरू केले. प्राचीन भारतीय विद्येविषयीचे संशोधनपर लेख प्रसिद्ध करणारे 'इंडियन अँटिक्वेरी' हे एक नियतकालिक होते. त्याचे प्रकाशन बंद पडले. प्रा. गोडे आणि डॉ. कत्रे यांनी त्या नियतकालिकाचे 'न्यू इंडियन अँटिक्वेरी' ह्या स्वरूपात पुनरुज्जीवन केले. 'ओरिएंटल लिटररी डायजेस्ट' हे नियतकालिक प्रकाशित होणाऱ्या संशोधनाची संशोधकांना माहिती देण्याच्या स्वरूपात होते. दोन्ही प्रकाशने फार काळ टिकली नाहीत. पहिले सुमारे दहा वर्षांनी १९३९-१९४८ आणि दुसरे तीन वर्षांतच (१९३८-१९४१) बंद करावे लागले. दुसऱ्या महायुद्धाची सुरुवात काहीशी ह्याला जबाबदार होती. प्रा. गोडे यांच्या सहकार्याने डॉ. कत्रे यांनी ह्या अवधीत पुढील तीन उत्कृष्ट अभिनंदन ग्रंथांचे संपादन केले : (१) सर डेनिसन रॉस (१९३९). (२) प्रो.एफ. डब्ल्यू. थॉमस (१९३९) आणि (३) डॉ. पी. व्ही. काणे (१९४१). डॉ. सुकठणकर हे त्यावेळी महाभारताच्या संशोधित आवृत्तीचे प्रमुख संपादकाचे काम करीत होते. त्यांच्याशी संबंध आल्यामुळे डॉ. कत्रे यांना पाठचिकित्सापद्धती या एका नव्या संशोधन क्षेत्राची चांगली माहिती मिळाली. डॉ. कत्रे यांच्या पहिल्या काही विद्यार्थ्यांचे पीएच.डी. पदवीचे प्रबंध संशोधित आवृत्तींशी संबंधित होते. डॉ. कत्रे यांनी स्वतः Introduction to Indian Textual Criticism (१९४१) हे पाठचिकित्सा पद्धतीची माहिती करून देणारे उपयुक्त पुस्तक लिहिले.

डॉ. कत्रे यांची डेक्कन कॉलेजात नेमणूक झाली तेव्हा प्रारंभी तिथे तीन प्राध्यापक आणि पाच प्रपाठकांची पदे होती. तीन प्राध्यापकांपैकीच एकाची संस्थेच्या संचालकपदी नियुक्ती करायची अशी योजना होती. तीन प्राध्यापकांव्यतिरिक्त आणखी एक संचालक-प्राध्यापक अशी योजना नव्हती. पहिले तीन प्राध्यापक डॉ. व्ही. एम. आपटे (वैदिक संस्कृत), डॉ.एस.एम. कत्रे (इंडोयुरोपिअन फिलॉलॉजी) आणि डॉ. एच्. डी. सांकलिया (एन्शंट इंडियन हिस्टरी) हे होते. काही कारणांमुळे ह्या तिघांपैकी

कोणाचीही नियुक्ती संचालक पदी न झाल्याने वर्षभरते पद रिक्त राहिले आणि त्याऐवजी एका कमिटी ऑफ डिरेक्शनने संचालकाचे काम केले. दुसऱ्या वर्षाच्या आरंभी (जून १९४०) डॉ. आय. जे. एस. तारापोरवाला यांची संचालक म्हणून निवड झाली. डॉ. तारापोरवाला यांचा अभ्यासविषयही इंडोयुरोपियन फिलॉलॉजी हा असल्याने आणि त्या विषयाच्या दोन प्राध्यापकांची मूळ योजनेत तरतूद नसल्याने एका वर्षातच डॉ. कत्रे यांना डेक्कन कॉलेज सोडायची वेळ आली होती. परंतु डॉ. कत्रे यांची योग्यता आणि विशेष म्हणजे नव्याने उभ्या राहणाऱ्या संशोधनसंस्थेस त्यांची उपयुक्तता यांची कल्पना पहिल्याच वर्षी संस्थेच्या प्रशासक मंडळाला आली होती, म्हणून त्यांनी डॉ. कत्रे यांना संस्था सोडावी लागू नये यासाठी एक अतिरिक्त प्राध्यापकाचे पद मंजूर केले आणि डॉ. कत्रे त्यांच्या जागेवर टिकून राहिले. डॉ तारापोरवाला यांनी दोन वर्षांतच संचालक पदाचा राजीनामा दिला आणि त्या पदावर डॉ. कत्र्यांची नेमणूक निवड समितीने केली (१९४२). त्या पदावरून डॉ. कत्रे १९७१ साली म्हणजे सुमारे तीस वर्षांनी निवृत्त झाले. डेक्कन कॉलेजच्या सुमारे साठ वर्षांच्या काळात इतका दीर्घकाळ संस्थेची धुरा सांभाळणारे डॉ. कत्रे हे एकमेव संचालक मिळालेल्या संधीचा सदुपयोग करून डॉ. कत्रे यांनी संस्थेचा विस्तार केला, आपल्या स्वतःच्या विभागाबरोबरच इतरही संशोधन विभागांच्या विकासाला पूर्ण वाव दिला, आणि संस्थेला आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा मिळवून दिली.

डेक्कन कॉलेजला मानाचे हे स्थान मिळवून देण्याचे काम डॉ. कत्र्यांनी लहान -मोठ्या अनेक उपक्रमांद्वारे केले.

त्यातला पहिला आणि प्रदीर्घ काळ चालणारा महत्त्वाचा उपक्रम म्हणजे संस्कृत भाषेच्या ऐतिहासिक महाकोशाची रचना (Encyclopaedic Dictionary of Sanskrit on Historical Principles). अशा प्रकारचा कोश तयार करण्याचे स्वप्न डॉ. कत्र्यांनी डेक्कन कॉलेजात प्रवेश केला तेव्हाच पाहिले असावे. त्यांची कल्पना फार भव्य होती आणि ती कृतींत उतरवायची तर त्यासाठी फार मोठ्या द्रव्यबळाची आणि अनुभवी, कार्यक्षम संशोधकांच्या साह्यांची आवश्यकता होती. डेक्कन कॉलेजच्या प्रारंभीच्या अवस्थेत तेव्हाच्या मुंबई सरकारकडून वार्षिक फक्त पंचाहत्तर हजारांचे अनुदान मिळत असे. त्यातून संस्थेचा सर्व कारभार-शिक्षकांचे पगार, व्यवस्थापन खर्च, ग्रंथालयाची वाढ- चालवायचा असल्याने ह्या तुटपुंज्या रकमेत संस्कृतचा बृहत्काय कोश उभारू पाहणे म्हणजे खरोखरच स्वप्न पाहणे होते. परंतु डॉ. कत्रे यांचा एक स्वभावविशेष असा होता की अडचणींचा फार मोठा बाऊ न करता आणि एखाद्या प्रकल्पाची आधी संपूर्ण तयारी होण्याची वाट न पाहता ते तो प्रकल्प लहान प्रमाणात सुरू करीत आणि त्याची उपयुक्तता प्रशासनाला पटली की

त्याची हळूहळू वाढ होऊ लागे. कोशाच्या बाबतीत असेच झाले. १९४२ साली संचालकपदाची सूत्रे हाती घेतल्यावर काही महिन्यातच त्यांनी Historical Dictionary of Inscriptional Sanskrit ह्या एका लहान कोशाच्या रचनेचे काम सुरू केले. त्यासाठी संस्कृत शिलालेखातले शब्द गोळा करण्यासाठी दोन सहायक नेमले (त्यांतला एक मी होतो.) डॉ. कत्रे यांच्या बृहत्कोशाची कल्पना यदाकदाचित कार्यान्वित झाली नसती तरी त्यांनी कल्पिलेल्या ह्या मर्यादित स्वरूपाच्या कोशाची आवश्यकता होती, कारण पूर्वीच्या संस्कृत कोशकारांनी संस्कृत शिलालेखांकडे संपूर्ण नसले तरी बरेचसे दुर्लक्ष केले होते. हा लहान कोश मर्यादित द्रव्यसाह्यावर आणि नियतावधीत पूर्ण करणे शक्य होते. ह्या कोशाचे शब्द गोळा करण्याचे काम जवळजवळ पूर्ण होण्याच्या सुमारास डॉ. कत्र्यांना त्यांच्या मोठ्या कोशाची बैठक जमविण्यात यश आले आणि मग त्या मोठ्या कोशाच्या शब्द संग्रहात त्या लहान कोशाची सामग्री संक्रमित करण्यात आली. मोठ्या कोशासाठी बसवलेल्या बैठकीची पुढे काही रूपांतरे होऊन अखेर डेक्कन कॉलेजात सध्या काम करीत असलेला स्वतंत्र संस्कृत कोशविभाग अस्तित्वात आला.

संस्कृतचे काही चांगले कोश पूर्वीही उपलब्ध होते. आजवरच्या संस्कृत संशोधनासाठी त्यांचाच उपयोग होत आला आहे. परंतु संस्कृत भाषेत उपलब्ध असलेल्या वाङ्मयाची समृद्धी पाहता पूर्वीच्या कोशांनी आधारासाठी घेतलेले सुमारे पाचशे ग्रंथ ही संख्या फार लहान म्हणावी लागेल. डॉ. कत्रे यांनी कल्पिलेल्या कोशाची आधारभूत ग्रंथसंख्या पंधराशे आहे. ह्या ग्रंथांची निवड करून त्या आधारे कोशाचा minimum programme प्रसिद्ध करण्याचे पहिले काम बहवंशी पॅरिसचे प्रा.लुई रनू (Louis Renou) यांनी केले. त्यांनी केलेल्या निवडीनुसार ह्या ग्रंथातील शब्दकोशासाठी कार्डावर संदर्भ व उद्धरणांसह लिहून काढण्याचे काम लगेचच सुरू झाले. ह्या कामाचा व्याप हळूहळू वाढू लागला आणि कोशाविभागात काम करणाऱ्यांची संख्याही वाढू लागली. त्यावेळचा संस्कृत कोश विभाग म्हणजे भारतातील निरनिराळ्या संस्कृत पंडितांचे रोज भरणारे एक संमेलनच असे. ह्या संमेलनात पंडितांच्या विचारांची देवघेव रोजच्या रोज होणे सोपे झाले. डॉ. कत्रे यांची कोशविभागाला दिलेली ही मोठी देणगी होती. अशा पंडितांच्या दैनंदिन उपस्थितीशिवाय कोशाचे काम यशस्वीपणे पुढे नेणे कठीण होते असे म्हटल्यास वावगे होणार नाही. ग्रंथातून शब्द कार्डावर उतरविण्याच्या ह्या आरंभीच्या कार्यात जे. अे. बी. फान बॉयटनन (J.A. B. van Buitenen) आणि जे. सी. हेस्टरमान (J. C. Heesterman ) ह्या दोन संस्कृत पंडितांचाही सहभाग होता. डॉ. कत्रे १९७१ साली डेक्कन कॉलेजातून निवृत्त झाले तेव्हा हे प्रारंभीचे काम पुष्कळसे, वेदविभाग वगळता, पूर्ण झाले होते. त्यानंतर,

आधीचे उरलेल काम पूर्ण करण्याचे, सर्व कार्डे अकारविल्हे लावण्याचे कार्डावरील माहितीच्या आधारे शब्दांचे अर्थ निश्चित करण्याचे आणि त्यांच्या कालानुक्रमे होणाऱ्या विकासाची जुळणी करण्याचे असे हे अतिशय महत्त्वाचे सर्व काम राहिले होते. डॉ. कत्रे जर केव्हां तरी त्यांनी कल्पिलेल्या कोशाचा एक लहानसा नमुना अंक **(Specimen Fascicule)** काढू शकले असते आणि त्यावर विद्वानांच्या आलेल्या प्रतिक्रिया लक्षात घेऊन कोशाची पहिली पाच-पन्नास पाने छापून प्रसिद्ध करू शकले असते तर त्यांनी स्वतःच त्यांच्या कोशकार्यावर स्वहस्ते कळस चढवल्यासारखे झाले असते. परंतु तसे होऊ शकले नाही. निवृत्त झाल्यावर ते अमेरिकेस गेले आणि तिथेच स्थिर झाले. कोशाचे उरलेले काम पार पाडून कोशप्रसिद्धीस सुरुवात करण्याचे कार्य डॉ. अ. म. घाटगे यांनी मुख्य संपादक ह्या नात्याने त्यांच्या सहकाऱ्यांच्या सहाय्याने चालू केले. ते काम डॉ. घाटगे यांच्या निवृत्तीनंतर आजही चालू आहे.

संस्कृत कोशासारखीच दुसरी महत्त्वाची कामगिरी डॉ. कत्रे यांनी अंगावर घेतली ती भाषाशास्त्राच्या सर्वांगीण अध्ययन-अध्यापनाची सोय भारतात सर्वत्र उपलब्ध करून देणे ह्या विषयीची आहे. पूर्वी भारतात भाषाशास्त्र हा एक स्वतंत्र विषय म्हणून फक्त कलकत्ता विद्यापीठात शिकविला जात असे. पुण्यात डेक्कन कॉलेज नव्याने सुरू झाले तेव्हा तिथे इण्डोयुरोपिअन फिलॉलॉजीचे एक पद निर्माण झाल्यामुळे निदान आर्यभारतीय भाषांच्या ऐतिहासिक अध्ययन अध्यापनाची सोय तिथे झाली. परंतु तिथले काम एकांगी म्हणजे भाषांचा उद्गम व विकास ह्यासारखे नुसते ऐतिहासिक स्वरूपाचे होते, भाषाशास्त्राची जी दुसरी अंगे आहेत वर्णनात्मक, सामाजिक, सांस्कृतिक इत्यादि, त्याविषयी तिथे काही काम होत नव्हते, दुसरी गोष्ट म्हणजे मुंबई, पुणे अशासारख्या महाराष्ट्रांतील विद्यापीठांत आणि महाराष्ट्राबाहेरच्या विद्यापीठांत भाषाशास्त्र ह्या विषयाचा शुकशुकाट होता. ही स्थिती दूर कारणे आवश्यक होते हे डॉ. कत्रे यांनी ओळखले आणि त्यादृष्टीने त्यांनी पावले टाकण्यास सुरवात केली त्यांच्या सुदैवाने त्यांना त्यांच्या परिश्रमांत उत्तम यश लाभले. ह्या कामाची सुरवात १९५३ साली डॉ. कत्रे यांनी डेक्कन कॉलेजात भाषाशास्त्रज्ञ आणि शिक्षणतज्ज्ञ यांची एक परिषद बोलावण्यापासून झाली. ह्या परिषदेच्या वृत्तांताच्या आधारे डेक्कन कॉलेज संस्थेला अमेरिकेच्या रॉकफेलर फाऊण्डेशनकडून पांच वर्षे मुदतीचे अनुदान मिळाले (परिषदेचा वृत्तांत १९५४ साली प्रसिद्ध झाला आहे.) ह्या द्रव्य सहाय्यामुळे डॉ. कत्रे १९५४-१९५९ अशी पाच वर्षे वर्षांतून दोनदा पुण्यात आणि भारतातील निरनिराळ्या विद्यापीठांत उन्हाळा व हिवाळी भाषाशास्त्रीय शिबिरे भरवू शकले. ह्या शिबिरांना मोठा प्रतिसाद मिळाला. शिबिरांत भाषाशास्त्राच्या विविध अंगांचे प्रारंभिक आणि प्रगत असे अध्यापन होऊ लागले. शिबिरांत एकदा आलेले काही विद्यार्थी पुन्हा दोन, तीन वेळा येत

असत. शिबिरातल्या अध्यापनासाठी भारताबरोबरच अमेरिका आणि इंग्लंडमधील भाषाशास्त्रज्ञ येत असत. रॉकफेलर फाउन्डेशनची मदत थांबल्यावर विद्यापीठ अनुदान मंडळाने डॉ. कत्रे यांनी आरंभ केलेल्या कार्याचे महत्त्व लक्षात घेऊन हा कार्यक्रम आणखी पाच वर्षे राबवला. रॉफ फेलार फाउण्डेशनतर्फे काही विद्यार्थ्यांना अमेरिकेतही भाषाशास्त्राचे उच्च अध्ययन करण्यासाठी वर्ष, दोन वर्षं राहण्याची सोय होती. ह्या सर्व उपक्रमांचे फलित म्हणून भारतात सर्व प्रमुख विद्यापीठांत भाषाशास्त्राच्या अध्ययन अध्यापनाला एक स्वतंत्र विषय म्हणून स्थान मिळाले. डेक्कन कॉलेजला भाषाशास्त्राचे प्रगत अध्ययन केंद्र Advance Centre in Linguistics ही प्रतिष्ठेची मान्यता १९६३ साली मिळाली.

डॉ. कत्रे यांना ग्रंथ प्रकाशनाची मोठी आवड होती. मुद्रणकलेत त्यांना रस होता. संस्थेतर्फे होणारी प्रकाशने रेखीव असावीत इकडे त्यांचे जातीने लक्ष असे. संशोधकांच्या संशोधनाला शक्य तो लौकर प्रसिद्धी मिळणे इष्ट असते हे ओळखून त्यांनी विविध प्रकारची प्रकाशने डेक्कन कॉलेज तर्फे सुरू केली. अगदी सुरुवाती संस्थेचे वार्षिक नियतकालिक म्हणून Bulletin of the Deccan College Research Institute सुरू झाले. (१९४०). पुढे संस्थेचे कार्यक्षेत्र वाढीस लागल्यावर, अनेक विद्यार्थ्यांनी संस्थेत काम करून पीएच. डी. साठी प्रबंध पूर्ण केल्यावर डॉ. कत्र्यांनी १९४६ पासून (Deccan College Dissertation Series) आणि Deccan College Monograph Series अशा दोन मालिका सुरू केल्या. १९६४ साली डेक्कन कॉलेजच्या इमारतीस शंभर वर्षे पूर्ण झाली आणि योगायोगाने त्याच वर्षी जुन्या डेक्कन कॉलेजचे एक संशोधन संस्था म्हणून नूतनीकरण झाल्याला पंचवीस वर्षे, पूर्ण झाली. म्हणून १९६४ साली डॉ. कत्रे यांनी (Building Centenary and Silver Jubilee Series). ही एक शंभर प्रकाशने अपेक्षित असलेली नवी मालिका सुरू केली. संस्कृत कोश विभागात काम करणाऱ्या अभ्यासकांसाठी V a K १९५१आणि Sources of Indo-Aryan Lexicography १९४७ अशी दोन प्रकाशने सुरू केली. दुसऱ्या प्रकाशनमालेमुळे संस्कृतचे अनेक अप्रसिद्ध कोश प्रसिद्ध होऊ शकले. डॉ. कत्रे यांनी स्वतः Dictionary of Panini तीन भागांत प्रसिद्ध केली (१९६८, १९६९). पुढे अमेरिकेत स्थायिक झाल्यावर डॉ. कत्र्यांनी पाणिनीच्या अष्टाध्यायीचे इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध करून (१९८७) लहान वयात सुरू केलेल्या पाणिनीच्या अध्ययनाची समाप्ती केली.

भारतीय भाषा आणि उपभाषा यांच्या भाषाशास्त्रीय अध्ययनाचे महत्त्व डॉ.

कत्रे यांनी ओळखले होते. त्यांनी स्वतः बरेच वर्षांपूर्वी कोंकणी भाषेचा वर्णविचार (Konkani Phonetics, १९३४) आणि कोंकणी भाषेची जडणघडण (Formation of konkani, 1942) ह्याविषयी दोन पुस्तके प्रसिद्ध केली होती, नंतर भाषाशास्त्राच्या अभ्यासाचे नवे वारे भारतभर वाहू लागल्यावर भारत सरकारने Archaeological survey of India च्या धर्तीवर Linguistic Survey of India अशी एक भारतीय भाषांच्या सर्वेक्षणासाठी कायम स्वरूपी संस्था स्थापन करावी ह्यासाठी त्यांनी प्रयत्न केले. त्यांच्या ह्या प्रयत्नांना यश आले नाही. तथापि त्यांच्या कारकीर्दीत महाराष्ट्र राज्य सरकार पुरस्कृत मराठीच्या बोलींचा अभ्यास डेक्कन कॉलेजात डॉ.अ.मा.घाटगे आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी केला आणि त्यावर प्रस्तकेही प्रसिद्ध झाली.

डॉ. कत्रे यांच्या मनात डेक्कन कॉलेजात एक स्वतंत्र छापखाना सुरू करण्याचा विचार होता. तसे झाले असते तर डेक्कन कॉलेजची प्रकाशने वेळेवर आणि त्यांच्या मनासारखी होऊ शकली असती. पण डॉ. कत्र्यांच्या ह्या प्रयत्नांनाही यश आले नाही.

अशा फार थोड्या बाबतीत डॉ. कत्रे यांचे प्रयत्न सिद्धीस गेले नसले तरी त्यांचे एकंदर संशोधकीय आणि प्रशासकीय जीवन समृद्ध झाले असेच म्हटले पाहिजे डॉ. कत्रे स्वतः मितभाषीं होते, त्यांचा स्वभाव मृदू होता. सौजन्य त्यांच्या रूपाने साकारले होते. त्यांचे व्यक्तिमत्त्व प्रभावशाली असून, उत्तम आरोग्याची त्यांना साथ होती. ते अत्यंत आतिथ्यशील होते आणि त्यांच्या ह्या स्वभावधर्माला त्यांच्या पत्नीचे संपूर्ण सहकार्य लाभले होते. संस्थेतील सर्व सहकाऱ्यांना ते आदराने वागवीत. आपल्या वरिष्ठ पदाचा धाक त्यांनी कधी कुणाला दाखवला नाही. त्यांच्याशी कुणाचा मतभेद असल्यास त्यांच्याकडे जाऊन तो व्यक्त करण्यास कुणाला संकोच वाटत नसे. मतभेद व्यक्त केल्यास आपणावर नाराजी होऊन कुठेतरी तिची झळ आपल्यापर्यंत पोचेल असा पुसट संशय देखील कोणाला येत नसे. सहकाऱ्याची काही चूक झाल्यास ती संभाळून घेण्याची त्यांची प्रवृत्ती होती. त्यांच्या हाताखाली काम करणारी मंडळी खरोखर भाग्यवान म्हणायला हवीत. त्यांतलाच मी एक होतो. त्यांच्या स्मृतीस माझे नम्र अभिवादन.

□□□

**प्रबोधन सोसायटी**
**एरंडवन, पुणे ४११ ००४**

# प्रा. सु. मं. कत्रे

जन्म ११ एप्रिल १९०६, होनावर, कर्नाटक राज्य, भारत. मृत्यू : २१ ऑक्टोबर १९९८

शिक्षण : गणपती हायस्कूल, मंगळूर, (१९१२-१९२३) एस.एस.एल.सी. उत्तीर्ण (१९२३)

गव्हर्नमेंट कॉलेज, मंगळूर (१९२३-२५) इंटरमीजिएट आर्ट्‌स व सायन्स उत्तीर्ण (१९२५)

प्रेसिडेंसी कॉलेज, मद्रास, (१९२५-२८) बी.ए. (ऑनर्स) उत्तीर्ण १९२८(आणखी दोन वर्षांच्या अंतराने म्हणजे १९३० मध्ये एम.ए. होण्याच्या तोडीचे)

स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज, लंडन युनिव्हर्सिटी (१९२८-३१) पी.एच.डी. संपादन (१९३१)

ओरिएण्टलिशेस सेमिनार, युनिव्हर्सिटी ऑफ बॉन, जर्मनी (१९३०)

**भूषविलेली पदे**

संस्कृतचे प्राध्यापक, नवरोसजी वाडिया महाविद्यालय, पुणे (१९३३-३४)

संस्कृतचे प्राध्यापक, स. प. महाविद्यालय, पुणे (१९३७-३९)

इंडो युरोपियन फायलॉलजीचे प्राध्यापक, डेक्कन कॉलेज, पुणे (१९३९-५९)

संचालक, डेक्कन कॉलेज, पुणे (१९४२-७१)

संचालक व जनरल एडिटर, डिक्शनरी ऑफ संस्कृत ऑन हिस्टॉरिकल प्रिन्सिपल्स, डेक्कन कॉलेज, पुणे (१९५१-७१).

संचालक, भाषाविज्ञानाचे प्रगत अध्ययन केंद्र, डेक्कन कॉलेज, पुणे (१९६४-६९)

व्हिजिटिंग प्रोफेसर, युनिव्हर्सिटी ऑफ टेक्सास ॲट ऑस्टिन, डिपार्टमेंट ऑफ लिंग्विस्टिक्स (१९६६ स्प्रिंग) आणि डिपार्टमेंट ऑफ ओरिएंटल ॲंड आफ्रिकन लॅंग्वेजिस ॲंड लिटरेचर (१९७० स्प्रिंग) प्रोफेसर, डिपार्टमेंट ऑफ ओरिएंटल ॲंड आफ्रिकन लॅंग्वेजिस ॲंड लिटरेचर, युनिव्हर्सिटी ऑफ टेक्सास ॲट ऑस्टिन (१९७१-७६) एमेरिटस (१९७६ पासून).

डिस्टिंग्विश्ड व्हिजिटिंग लेक्चरर, कॅलिफोर्निया स्टेट युनिव्हर्सिटी, फुलरटन (७८-७९)

## BIBLIOGRAPHY OF DR. KATRE'S WRITINGS

1931 Early Buddhist ballads and their relation to the older Upanisads, University of London, Ph.D. Dissertation. 1931.

1934 Some fundamental problems in the Upanisads and early Pali ballads. Review of philosophy and religion 5 :105-131 (1934).
Education in Buddhism. Nowrosjee Wadia college Miscellany (Poona, January 1934) Pali *akheyyam*. Calcutta Oriental Journal 1 : 172-173 (1934). *Sanskrit bhagini* and its cognates. Calcutta Oriental Journal 1 : 176-177 (1934).
Pali miscellany I : *Velli.* Calcutta Oriental Journal 1 : 221-223 (1934)
Pali miscellany II :Kaṭṭhaka. Calcutta Oriental Journal2 :57-59 (1934).
Treatment of ṛ in Pali. Annals of the Bhandarkar Oriental Research Institute 16 : 169-201 (1934).
Comparative glossary of Koṅkani. Calcutta Oriental Journal 2 : 1-24 (1934). 2:25-72 (1935), 3 : 75-96 (1935), 3 : 97-112 (1936).

1935 Initial *jh* in Indo-Aryan. Calcutta Oriental Journal 2 :97-104 (1935).
**Konkani Phonetics.** Journal of the Department of Letters, Calcutta University 26 : 1-19 (1935). **Also issued as : Calcutta University Phonetic Studies 3. Calcutta : Calcutta University Press, 1935.**

1937 Epic iyat and blends of aorist and optative forms. Journal of the American Oriental Society 57 : 316-317 (1937).
**Formation of Konkani.** Annals of the Bhandarkar Oriental Research Institute 18: 97-120. 241-64, 361-84 (1937). 19 : 25-48 (1938), 20 : 25-48, 152-76 (1940); 22 : 272-87 (1942); A Comparative and etymological index. Bulletin of the Deccan College 3 : 3 : 291-348 (1942). **Reprinted in book form : Bombay : Karnataka Publishing House,1942. Reprinted without the Index. Building Centenary and Silver Jubilee Series 28. Poona : Deccan College,1966.**

1937 Indo-Aryan Lexicography. The Poona Orientalist 1 : 5 1-14 (April 1937).
A Muslim contribution to Apabhraṁsa literature. Karnataka Historical Quarterly 4 : 15-24 (1937).
Reviews. Annals of Bhandarkar Oriental Research Institute 18 : 215-24, 308-8, 405-8 (1937).
Reviews. The Karnataka Historical Review 4 : 108-119 (January - July 1937).
Sanskrit KS in Pali. Journal of the Bihar and Orissa Research Society 23 : 1 : 1-15 (1937).

Sanskrit sriphala and "Divine Fruit". American Orientalist 9: 215-216 (1937)
The suffix tha in pali. The Poona Orientalist 1 : 4 : 23-25 (January 1937).

1938 **(translator) Krsnayajurveda : adhana, punaradhan sections ; prakaranakaumudi. In: Mimamsa and Dharmasastra Series 1 (1938). Agnihotra and pravasopasthana sections. In : no. 2 of the series (1939).**
**Poona : Mimamsa Granthaprakashak Samiti.**
Epic *iyat*. New India Antiquary 1 : 536 (1938).
Notes on Marathi etymology I. New India Antiquary 1 : 399-403 (1938).
Prakrit *Goha.* Sardesai Commomorative Volume (ed.S.R. Tikekar) : 173-176 (1938).
Reviews. Annals of the Bhandarkar Oriental research Institute 19 :1 : 99-100 (1938).
Materials for a dhatupatha of Indo-Aryan. Indian Culture 4 : 485-493 (1938) ; 5 : 3 : 239-244 (1939).

1939 Indo-Africa. Bulletin of the Deccan College 1 : 153-156 (1939-40) **and Gode P.K. (editors). A volume of Eastern and Indian Studies presented to Prof. F. W. Thomas. New Indian Antiquary extra series. 1. Bombay : Karnataka Publishing House. and Gode P.K. (editors). A Volume of Indian and Iranian Studies Presented to Sir Denisson Ross. New Indian Antiquary extra series 2. Bombay: Karnataka Publishing House.)**
Names of Prakrit languages. Sir Denison Ross Volume... (1939).
Apropos epic *iyat.* Bulletin of the Deccan College 1 :1 : 8-13 (Decemaber 1939).
Old Indo-Aryan umna-vabhi. Worter and Sachen. NF 2 (1939).
Address of the President of the Linguistic Section. Delivered at 9th All India Oriental Conference. Trivandrum 1937. Proceedings :1165-90 (1939).
Reduplicatives in Indo-Aryan. Bulletin of the Deccan College1: 1 : 60-70(1939). Sanskrit lexicography and middle indo-Aryan. Woolner Commomorative Volume (ed. M.Shafi) : 133-136. Lahor (1939).
Two middle Indo-Aryan words. F.W. Thomas Presentation Volume: 141-143(1939).

1940 A New approach to the study of middle and modern Indo-Ayran. Bhartiya Vidya 1:2 : 135-143 (May 1940).
New lines of investigation in Indian linguistics. Annals of the

Bhandarkar Oriental Research Institute 20:276-292 (1940).
On a thesaurus linguae Sanscritae. New Indian Antiquary quarterly 4:271-279 (1940).

1941 **Introduction to Indian Textual Criticism. (Appendix II by Gode, P. K.) Bombay : Karnataka Publishing House, 1941. Kannada translation by N. Laxminarayana Bhatta, Bhartiya grantha sampādana paricaya, Bangalore : Harshawardhan Prakashana, 1968.**

**The Roots of the Pāli dhātupāthas. Bulletin of the Deccan College 1:2-4: 228-317 (March 1940). IInd ed. Deccan College Handbook Series 5. Deccan College, 1954).**

The importance of Jaina literature of middle Indo-Aryan linguistics. Jain Vidya. (November 1941).

On the present needs of Indian lingusitics. Poona Orientalist 6 : 3-4 : 125-140 (1941).

**Some problems of historical linguistics in Indo-Aryan.** Bhartiya Vidya 2 : 220-239 (1941). Authorised summary of his **Wilson Philogical Lectures 1940-41. University of Bombay, delivered Bombay 25,26,27 February, 3,4,5 March 1941. Lectures issued in book form : Bombay : University of Bombay 1944.**

Studies in the rhythm of Old Indo-Aryan vocables. The nominal compounds in the Satapatha Brahmana Bulletin of the Deccan College 3 : 181-211 (1941).

A Note on rhythm of nominal compounds in Satapatha Brahmana New Indian Antiquary 5 : 83-89 (1941).

**and Gode, P. K.(editors) Volume of studies in Indology presented to P.V. Kane. Poona Oriental Series No.75. Poona : Oriental Book Agency, 1941.**

Polyglottism of Namadeva. 10th All India Oriental Conferance. Tirupati 1940 Proceedings (1941).

Linguistics and the critical edition of the Mahabharata. 10th All India Oriental Conference. Tirupati 1940. Proceedings : 218 (1941).

Prakrit uccidima and uccudai. P.V. Kane Volume 258-259 (1941).

1942 Introduction. In : S. G.Tulpule. Yādavakālina marathi bhāsā : 1-15 Bombay : K. B. Dhawale,1942.

Sanskrit vocables in Dravidian inscriptions. Gopalkrishnamachari Commemorative Volume 4 : 72-80 (1942).

On some words for 'child' in Indo-Aryan. Annals of the Bhandarkar Oriental Research Institute (Silver Jubilee Number) 23 : 242-249 (1942).

1943 Dharmopanisad in Mahabharata Journal of the Ganganatha Jha Research Institute 1:2:118-122 (November 1943).

In Memorian. Vishnu Sitaram Sukhthankar. 1887-1943. Annals of the Bhandarkar Oriental Research Institute 24 : 123-135 (1943)

The influence of popular dialects on Sanskrit. Annals of the Bhandarkar Oriental Research Institute 24:9-26(1943).

1944 Vishnu Sitaram Sukhthankar and his contribution to Indology. Bulletin of the Deccan College 5 : vii-lvi (1944).

1945 A Family of scribes. Bhārat-kaumudī or Studies in Indology in honour of Dr. Radha Kumud Mookerji : 333-338.Allahabad.(1945)

History of LL. in Pali.B.C. Law Commomoration Volume II : 22-34. Calcutta (1945).

**Prakrit language and their Contribution to Indian Culture. Bharatiya Vidya Studies No. 3 Bombay : Bharatiya Vidya Bhavan, 1945. Reprinted with slight modifications Building centenary and Silver Jubilee Series 17. Poona : Deccan College, 1964.**

1946 On Some new phonological tendencies in new Indo-Aryan. Acharya Dhruva Commemoration Volume 3 : 197-199. Ahmedabad. 1946.

1948 Amara's Contribution to Indian Lexicography. Vikram Volume Ujjain : Saridia Oriental Institute. 1948.

1949 **Descriptive catalogue of Vedanta manuscripts, 3 volumes. Poona : Bhandarkar Oriental Research Institute, 1949, 1953.**

On Sanskrita Kroda. Kevalananda Saraswati Presentation Volumes 2 : 222.

Wai : Pradyapathashala Mandala. 1952.

1953 On Sanskrita *Pariyavāsas.* Khareghat Commomorative Volume 1:259-261 Bombay. 1953.

1954 On Sanskrit *'dasati'* (Speaks). Chitrav Shastri Presentation Volume 2:43. Poona. 1954

**Report on the informal conference of linguist and educationsists. 26th to 28th May 1953. Poona : Deccan College, 1954.**

On tiranhu. teranhu (Ka) and trirasmi. Indian Linguistics : 14 (dedicated jules Bloch) : 597-599 (1954).

1955 On two new Indo-Aryan words. Indian Lingustics 16 : 3213 (1955).

1956 Beestigs in Kannada. Annals of the Bhandarkar Oriental Research Institute (1956).

1957 On a special location in Southern Kannda.Tamil Culture 6 : 246 - (1957).

On some 'laukika' words cited in the commentaries of

Cakrapanidatta on Caraka and Dalhana on Susruta. Bulletin of the Deccan College 18:226 25 (1957).

On the caste names Naito in Konkan. Bulletin of the School of Oriental and African Studies (Turner Volume) : 365-6 (1957).

Presidential address. The Konkani Conference. 6th Session. Bombay. 1957.

1958 Primitive middle Indo-Aryan "Dent" (stock or stem). Nāgarī prācharini Patrika, year. 63. No. 3-4. 1958.

1959 Vōcabulary and syntax. In : Affinity of Indian languages :11-15 Delhi : Publication Division. Government of India. November 1959

Towards linguistic uniformity. Studies in Education and Culture in honour of D. C. Pavate : 210-15. Dharwar. 1959.

**Report of the blue-print Committee on the Developing of Linguistic Studies in Indian Universities. Supplement to Indian Linguistics 20. Poona : Linguistic Society of India. 1959.**

Two etymological notes. Indian Linguistics 20 : 145 (1959)

**Two lectures on Linguistics. (1. The future of Indian Linguistics 2. Etymology and Historical Grammer).Agra : K. M. Institute of Hindi Studies and Linguistics, Agra University, 1959.**

1960 On Indo-Aryan words for 'lid. cover'. Bulletin of the Deccan College 20 : 369-74 (1960).

1961 **Introduction to modern Indian Linguistics with Special reference to Indo-Aryan and Assamese. Delivered as Pratibha devi memorial lectures, 1958. Jhalukbari (Assam): University of Gauhati, 1961.**

One script. Cultural Forum. 18-23 Bulletin of the Ministry of Scientific Research and Cultural Affairs. New Delhi, 1961.

1963 Review of Turner's Comparative Dictionary of Indo-Aryan. Bulletin of the School of Oriental and African Studies. 26 : 3 : 62-64 (1963).

1964 Linguistics and modern Indian Languages. Oriental Studies in India : 61-72. 26th International Congress of Orientalists. New Delhi. 1964.

1965 Consonental Germination in Konkanī. Indian Linguistics 26 : 237-239 (1965).

**Lexicography. Annamalai University Publications in Linguistics, No. 6. Annamalainagar : Annamalai University, 1965.**

1966 Old Indo-Aryn *acam* and its cognates in New Indo-Aryan. Professor Birindhi Kumar Barua Commemoration Volume : 8.Gauhati. 1966.

**Paninian Studies 1. Building Centenary and Silver Jubilee Series 52. Poona : Deccan College.**

Progress of General Linguistics during the last 75 years. Chitrao Shastri Felicitation Volume 1-28. Poona. 1967.
Review of Paul Horsoh : Die Vedische Gāthā and sloka-Literatur. Journal of the Vishveshvarananda Vedic Research Institute (Hoshiarpur 1967).

1968 **Problem of Re-construction in Indo-Aryan. Delievered1967 Simla : Indian Institute of Advanced Study, 1968.**
Dictionary of Panini, 3 parts. Being his : Paninian Studies 2-4. Building Centenary and Silver Jubilee Series 53, 62, 63. Poona : Deccan College, 1968, 1968, 1969.
Indo-Africa In : J. C. Heesterman et. al (ed) Pratidanam: Studies presented to Prof. Kuiper. The Hague : Mouton. 1968.

1980 Current trends in Indian Lexiography. In : L. Zgusta (ed) Theory and Method in Lexicography Columbia, 1980.

1981 Glossary of grammatical elements and operations in Astādhyāyi. Central Institute of Indian Language occassional monograph series 20. Mysore, 1981.

1987 Astdhyayi of Pānini (Roman transliteration and English translation.) Texas Linguistic Series. Austin : University of Texas Press, 1987.
Reprinted : Delhi : Motilal Banarasidas, 1989.

ही सूची परिपूर्ण नाही.

( Bulletin of the DCPRI 51-52 मधून उद्धृत )
ही लेखनसूची **डॉ. अशोक रा. केळकर** यांनी संकलित केलेली आहे.
(संपादक)

# 'सुंटदेव' म्हणजे काय?

**विजया तेलंग**

'लीळाचरित्रा'मध्ये 'भटा' अद्वैत समर्थनी 'म्हांइंभटां कुमति हरणे' या नावाची एक लीळा आहे. तिचा प्रारंभ असा होतो, ''छीन पापासि गोसावी बीजे केले'' गोसावीयांसी उदयांचा पुजा अवस्वरू जाला, गोसावीयांसी गुंफेबाहिरिला ओटेयावरि असान असे : भटमुक्ष करूनि भक्तजन अवघे मातिकाम करिताती : म्हाइंभट गोसावीयांचेया दरीसना आले : मग म्हांइंभटी म्हणीतले ''गोसावी परमेश्वरु : एर आवघे सुंटदेव''

म्हाइंभट चक्रधरांच्या दर्शनाला येतात तेव्हा त्यांच्या आसपास मुख्यतः नागदेव आदि 'अवघे' भक्तजन 'मातिकाम' करीत असलेले म्हाइंभटांना दिसतात. त्या सगळ्यांबरोबर नागदेवाचार्यांचा अधिक्षेप करताना म्हाइंभट त्यांना 'सुंटदेव' म्हणतात. 'मातिकाम' मधून शारीरिक कष्टाची सूचना आहे. आणि ते करण्याऱ्याला शरीरबल असले तरी बुद्धिबळ नाही अशी सूक्ष्म तुटकता 'सुंटदेव' या अभिधानातून म्हाइंभटाला व्यक्त करायची आहे.

नागदेवाचार्यांना तो तुच्छतेने ''सुंटदेव'' म्हणतो, असे 'लीळाचरित्रा'च्या आपल्या प्रस्तावनेत डॉ.शं.गो. तुळपुळे सांगतात. (२) या लीळेवरील टीपेत त्यांनी पुढील स्पष्टीकरण केले आहे. ''एकू गोसावी ईश्वरु : एरु अवघे सुंटदेव'' : म्हाइंभटाच्या मनात चक्रधरस्वामीं विषयी श्रद्धा असली तरी त्यांच्या परिवारातील इतरांना तो मानीत नसे. विशेषतः नागदेव किंवा भटोबास याच्या विषयी त्यांच्या मनात अनादरच होता. म्हणूनच तो त्यांचा उल्लेख उपहासाने 'सुंठदेव' असा करतो. या प्रसंगी स्वामींनी भटोबासांना स्फूर्ती दिली व त्यांच्याकडून अद्वैत चर्चा करविली. ती ऐकून म्हाइंभटाचे मतपरिवर्तन झाले व तेव्हापासून तो त्यांना मानू लागला. तुळपुळे यांच्या संहितेत 'सुंटदेव' असाच पाठ आहे. परंतु प्रस्तावनेत आणि टीपेत त्यांनी ''सुंठदेव'' असे का लिहावे ते कळत नाही. आपल्या आवृत्तीच्या 'शब्दकोशात' मात्र त्यांनी 'सुंटदेव' असाच शब्द दिला आहे. आणि 'अज्ञानी जन (उपहासाने)' हा अर्थ सांगितलेला आहे.

अर्थ बरोबर आहे. पण डॉ. कोलते यांनी आणखी एका लीळेतील संदर्भ देऊन अधिक नेमका अर्थ आपल्या शब्दकोशात दिलेला आहे. -'मठ्ठ ठोंब्या'

डॉ. कोलते यांनी निर्देशिलेली लीळा त्यांच्या प्रतीत ४५० क्रमांकाची असून चक्रधरांनी नागदेवांना सांगितले की, इंद्रभटाबरोबर 'कटका दानासि' जा, ''तवं भटी म्हणीतले'' ''जी-जी मी काइ जाउनि करू ? मी नुसुधा सुंटदेओ काही साश्र नेणे.''

''मी नुसुधा सुंटदेओ'' ऐवजी उपलब्ध असलेला दुसरा पाठ आहे. ''आम्ही मूर्ख सुंठ देव'' तुळपुळ्यांचा 'सुंठदेव' या पाठभेदातून त्यांच्या लेखनात अवतरलेला दिसतो. किंबहुना स्वतःच स्वतःच्या 'पाठ' शिवणीचा मनोरंजक खेळ खेळताना दिसतो.

''सुंठदेव'' हाच अधिक अन्वर्थक पाठ आहे आणि अर्थ देताना डॉ. तुळपुळे आणि डॉ. कोलते यांनी लीळेतील अन्वयार्थावरच भर दिलेला आहे. या खेरीज अन्य ग्रंथाचा, वाक्यप्रचाराचा आधार त्यांना मिळालेला नाही. मिळाल्याचे त्यांनी म्हटलेले नाही किंवा तसा संदर्भही दिलेला नाही.

परंतु कन्नडमध्ये ''शुंठ'' असा शब्द आहे. रे. किटेल यांनी त्याचा **"a block head adult"** असा अर्थ सांगितलेला आहे. एवढेच नव्हे तर उदाहरण म्हणून एक कन्नड म्हणही उद्धृत केलेली आहे ''शुंठ निगे एष्ट्र कलिसिदर् व्यर्थ'' ''शुंठाला अष्टमांश शिकवलं तरी व्यर्थ.''

''सुंटदेव'' म्हणजे काय हे कळायला आणि डॉ. कोलते यांनी दिलेल्या अर्थाला ग्रांथिक आधार दयायला कन्नड मधील 'शुंठ' व त्याचा वापर सध्या तरी महत्त्वाचा ठरतो. पुंडलिकजी कातगडे आपल्या कोशात हा शब्द संस्कृत आहे असे म्हणत असले तरी वस्तुस्थिती तशी नाही. द्राविडी भाषांतच त्याची रुपे आणि अर्थ विशेष धुंडाळले पाहिजेत.

**संदर्भः**


१) लीळाचरित्र (सं) डॉ. वि. भि. कोलते, उत्तरार्ध, लीळा म. रा. सां. स. मुंबई १९७८.

२) लीळाचरित्र (सं) डॉ. शं. गो. तुळपुळे, उत्तरार्ध भाग १ प्रस्तावना, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर पुणे १९६७, पृ. १३.

३) तत्रैव, लीळा १३७ वरील टीप पृ. १६४.

४) तत्रैव, शब्दकोश पृ. २०४

५) पूवोक्त, लीळाचरित्र (सं) कोलते पृ. ९२६.

६) तत्रैव पृ. २६३.

७) Kittel's Kannada-English Dictionary (Ed) Prof. M. Mariappa Bhat, Vol. IV. University of Madras 1973 P.1536

८) कन्नड मराठी शब्दकोश (सं) पुंडलिकजी कातगडे महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई १९६९ पृ. ५७७.


□□□


**मराठी विभाग, गुलबर्गा विश्वविद्यालय,**
**गुलबर्गा. ५८५ १०६**

# तेच ते ...

**स्नेहल तावरे**

परवाचीच गोष्ट. महाविद्यालयातून घरी जाण्यासाठी बाहेर पडणार तोच दोन-तीन विद्यार्थिनींनी हाक मारली ''मॅडम्'' मी वळून, हसले ''काय गं?''

''तुम्ही 'वाडमयाचा' तास, उद्या कधी घेणार ?'' प्रश्न साधाच, पण 'वाडमय' म्हटल्यावर कोणीतरी आपल्या हातात वाडगा दिला आहे आणि आपण शब्दांची भीक मागत आहोत असाच क्षणभर भास झाला. माझ्यातला शिक्षक खडबडून जागा झाला. तिला मी म्हटले, ''वाडमय म्हणू नकोस, वाङ्मय म्हण, 'वा ऽ ङ् म ऽ य,'

ती भलतीच हुषार! म्हणते कशी, ''तेच ते! पुस्तक कोणते वापरू ते सांगा?'' (नशीब, नोटस् कोणत्या वापरू असे विचारले नाही.)

म्हणजे शुद्धीकरणाचे दरवाजे खाडकन बंद झाले. तिचे 'तेच ते ' याचा अर्थ तुम्ही म्हणता तेच मला म्हणायचे आहे. किंवा तिच्या दृष्टीने वाडमय म्हटले काय आणि वाङ्मय म्हटले काय, अर्थ एकच.

एका विद्यार्थ्याने एक परीक्षण दिले. कोणत्या लेखकाचे पुस्तक आहे, म्हणून बघितले तर मोठ्या अक्षरात लिहिले होते 'चंदणसीव'. त्याला म्हटले हे आडनाव 'चंदनशिव' असेल, बघ बरं. ''तो घुश्यातच म्हणाला, 'चंदणसीव' चा अर्थ तुम्हाला माहीत नाही ? त्यांच्या पूर्वजांनी चंदणाला सीवलं होतं म्हणून त्याचं आडनाव 'चंदणसीव' पडलं.

आता आश्चर्यचकित व्हायची माझी पाळी मी 'चंदण' नावाचा पदार्थ पाहिलाच नव्हता. देवघरातले 'चंदन' फक्त परिचयाचे आणि 'सीवलं' म्हणजे तरी काय? स्पर्श केला की सुईदोऱ्यानं शिवलं ? शेजारच्या मित्राचा हवाला देत त्याने पुढे म्हटले, ''हणमंता, बरोबर आहे ना ?''यावर तुम्ही तरी काय बोलाल?

मध्यंतरी एका प्राध्यापकांनी काढलेली प्रश्नपत्रिका वाचली. पहिलाच प्रश्न होता ''आप्पा ओरपे यांचे जीवन चित्रण चितारा.' आणि दुसरा प्रश्न तर अधिकच गहन. 'मापाडी कामगार संघटनेचे काम लेखक आप्पा ओरपे करीत असताना सुरुवातीच्या प्रारंभ भागात त्यांना आलेल्या अडचणींचे वर्णन लेखकाने सदर आत्मचरित्रात कसे केले आहे, हे तुमच्या शब्दात थोडक्यात निवेदन करा.''

प्रश्न वाचला आणि कपाळाला हात लावला. 'अप्पा कोरपे' लेखक असताना 'अप्पा ओरपे' कसे झाले हे समजेना. 'जीवन चित्रण चितारा' म्हणजे कशाकशाने फटकारे मारायचे? दुसऱ्या प्रश्नाचे आकलनच माझ्यातील विद्यार्थ्याला झाले नाही. एक तर प्रश्न विचारताना भला मोठा विचारला आणि थोडक्यात निवेदन (म्हणजे उत्तर लिहा) करायला सांगितलेले, त्यातही 'सुरुवातीच्या प्रारंभ भागात' म्हणजे काय? आणि एकाच प्रश्नात दोनदा लेखकाने का डोकवावे हेही कळेना. त्याचक्षणी उत्तरपत्रिका कोऱ्या का राहतात हे मात्र मला समजले.

**८६३, स्नेहवर्धन, सदाशिव पेठ,**
**पुणे- ४११ ०३०. दूरध्वनी: ४७ २५ ४९**

# मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन
## वर्ष १६, १९९८ ची सूची
### (१ : हिवाळा, २ : उन्हाळा, ३ : पावसाळा, ४ : दिवाळी)

## लेखकसूची

१९९८ / पृ. १९

पाटणकर जयश्री / संकलित लेखांचे फलित (पुस्तक परीक्षण) / १६:४ दिवाळी १९९८ / पृ. २५

बडवे नीती / भाषिक संज्ञापन / १६:४ दिवाळी **१९९८** / पृ. ४९

भावे ह. अ. / शब्दकोड्यांची जन्मकथा / १६:२ उन्हाळा **१९९८** / पृ. ४६

मुंडले आशा / मराठीचे चांगभले / १६:३ पावसाळा **१९९८** / पृ. २६

मेहेंदळे म. अ./ डॉ. सुमित्र मंगेश कत्रे : डेक्कन / **१६:४ दिवाळी** १९९८/ पृ. ४९

शहा मृणालिनी / नाते अक्षरांशी (ज्याची त्याची प्रचीती)/ १६:१ हिवाळा १९९८ / पृ. ४८

शहा मृणालिनी / भाषेशी घसट - चांगल्या अर्थाने (संपादकीय) / १६:२ उन्हाळा १९९८ / पृ. १

शहा मृणालिनी / म्हणी : अनुभवांचे वेचक मोती (**पुस्तक परीक्षण**) / १६:२ उन्हाळा १९९८ / पृ. ५२

सहस्रबुद्धे सुप्रिया / बहुमानार्थी बहुवचन (शंका आणि **समाधान**) १६:२ उन्हाळा १९९८ / पृ. ३०

सहस्रबुद्धे सुप्रिया / हिंदी साहित्य आणि पत्रकारिता **यांच्यातील** नाते / १६:२ उन्हाळा १९९८ / पृ. ३४

सामंत सत्त्वशीला / भाषाविज्ञानाचे नमुनेदार उपयोजन (**पुस्तक परीक्षण**) / १६:३ / पावसाळा १९९८ / पृ. २९

सामंत सत्त्वशीला / पंचेंद्रियांसी श्रुतीही रिघाल्या / **१६:२ उन्हाळा १९९८** /पृ. ४४

साधुदास / गो. गो. मुजुमदार / महाराष्ट्र माउली / **१६:३ पावसाळा** १९९८/ पृ. ४४

सार्वेकर कैलास / आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषिक **न्यूनगंड : काही** प्रतिक्रिया / १६:२ उन्हाळा १९९८ / पृ. ३७

सार्वेकर कैलास / आदिवासी विद्यार्थ्यांमधील भाषिक **न्यूनगंड :** वास्तव आणि उपाय / १६:१ हिवाळा १९९८ / पृ.५२

सोहोनी लीना / अनुवाद : एक कला / १६:१ हिवाळा १९९८ / पृ. ४०

**लेखसूची**







अनुक्रमणिका

अंक ३ : तीर्थी धोंडा पाणी
देव रोकडा सज्जनी

□□□

**११४, सार्थ तुकाराम गाथा, खंड पहिला,**
**डॉ. प्र. न. जोशी, विदर्भमराठवाडा बुक कंपनी, पुणे.**

**पैसे भरण्याबद्दल सूचना :**

पैसे रोख दिल्यास आठवणीने पावती घ्यावी. चेक 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. मनिऑर्डरकूपनवर किंवा चेक सोबतच्या चिठ्ठीवर पैसे पाठवणाराचे नाव, पत्ता, रक्कम आणि ती कशा पोटी पाठवली. ते अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता मिळाला, याचा उल्लेख करावा. चेक बँकेच्या पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ भर घालावी. पावती मागाहून पाठविली जाईल.

**पत्रिकेची वर्गणी :**

पत्रिकेची वार्षिक वर्गणी भरताना पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असेच राहील हे लक्षात घ्यावे. पत्रिकेचे वर्षात चार अंक निघतात. मात्र १९८३ मध्ये केवळ दोनच अंक निघाले आहेत. पत्रिकेचे चालू वर्षाव्यतिरिक्तचे अंक हवे असल्यास मिळू शकतील. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे करण्यात येते :

- चालू वर्गणी परिषदेच्या सामान्य सभासदांसाठी (सभासद वर्गणी धरून) वर्षाला ७५ रु.
- चालू वर्गणी संस्था आणि सभासद नसलेल्या व्यक्ती यासाठी वर्षाला १००रु.
- सुट्या अंकाला (मग तो चालू वर्षाचा असो, की मागील यापैकी असो)२०रु.
- परदेशातील संस्थांसाठी वर्षाला २० डॉलर.
- सुटा अंक परदेशी पाठवायचा झाल्यास त्याची किंमत ६ डॉलर इतकी पडेल.

**परिषदेची वर्गणी :**

सामान्य सभासदांची वार्षिक वर्गणी वर दिलीच आहे. एका घरात एकापेक्षा अधिक सामान्य सभासद असले आणि त्यापैकी एकाच्याच नावावर पत्रिकेचा अंक हवा असला तर इतर सभासदांनी केवळ ३५ रु. भरायचे आहेत. उदाहरणार्थ : एका घरात दोन सभासद आणि एक अंक अशी स्थिती असल्यास वर्षाला ७५रु. + ३५ रु. असे एकूण ११० रु. भरावे लागतील.

**जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान ७५० रु., अर्धे पान ४०० रु. पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ चार १००० रु., आवरण पृष्ठ दोन/तीन ८०० रु. जाहिरात हिंदीत वा इंग्रजीत असल्यास चालेल, मराठीत असल्यास उत्तम.

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

**मराठी अभ्यास परिषदेची** स्थितिगती आपल्या सर्वांच्या सहकार्यावर अवलंबून आहे. एक करू शकाल?

परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर कार्यवाहांशी संपर्क साधून त्यांना तशी कल्पना द्या.

परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी सहाय्य हवे आहे. ते देऊ शकाल.

आणखी, अर्थातच परिषदेचे क्षितिज विस्तारण्यासाठी नव्यानव्या कल्पना.

**'भाषा आणि जीवन'साठी :**

पुढील स्वरूपाचे लेखन हवे आहे -

परभाषांमधून अनुवाद

ग्रंथपरीक्षणे

'पुनर्भेट', 'वाघिणीचे दूध' अशा सदरांस योग्य मजकुराविषयी सूचना, भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतरत्र वाचनात आलेल्या मजकुराची कात्रणे. जाहिराती आणि वर्गणीदार तर हवेतच.


संपर्क :

**मराठी अभ्यास परिषद**

**१ शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवन,**

**पुणे ४११००४. (दूरध्वनी ३३३८६९)**